या नाटकाचा पहिला प्रयोग शुक्रवार, ता. १५ ओप्रिल १९३८ रोजीं दिवसा 'नाट्यकला प्रवर्तक संगीत मंडळी'नें मुंबओी येथें 'बॉंबे थिअेटरां'त करून दाखविला.

(आवृत्ति दुसरी, १९५० जुलै)

# काकबळी



मुंबअी येथें बॅ. तात्याराव सावरकर यांच्या अध्यक्षत्वाखालीं भरणाऱ्या बावीसाव्या मराठी साहित्यसंमेलनाचा सुयोग साधून मला माझें हें सातवें नाटक मुंबअीकर रसिक प्रेक्षकांच्या पुढें आणतां येत आहे म्हणून अतिशय समाधान होत आहे. पुस्तकाचे मुद्रणांत 'अ' च्या बाराखडीचा अंगीकार करण्याचें तात्यारावांना पूर्वी दिलेलें वचन याच वेळीं खरें करून दाखविण्यांत म्हणूनच मला विशेष उत्साह वाटत आहे.

मराठी रंगभूमीची गेलीं त्रेचाळीस वर्षें निरलसपणें सेवा करणाऱ्या 'नाट्यकला प्रवर्तक संगीत नाटक मंडळी'चे कर्तृत्ववान् धनी श्री. भाटेबुवा नि त्यांचा उत्साही नटनटीवर्ग यांनीं 'नाट्य-कला' जगविण्यासाठीं आजपर्यंत हालअपेष्टा भोगल्या नि जो स्वार्थत्याग केला त्याविषयीं वाटणाऱ्या आदरबुद्धीनेंच हें नाटक मी त्यांच्या विद्यमानें रंगभूमीवर आणीत आहें. हा योग जळवून आणण्याचें श्रेय 'बालमोहन नाटक मंडळी'चे धनी श्री. दामुअण्णा जोशी यांनाच आहे हें विशेष लक्षांत घेण्यासारखें आहे.

प्रस्तुत नाटकांत मुंबअीचें वातावरण पदोपदीं भासमान होअील. मुंबअीकरांनाच परिचित असलेल्या गोष्टींचे उल्लेख अनेक वेळां केलेले आढळून येतील. पुणेंकर म्हणून माझा विशेष लौकिक असला तरी मुंबअीच्या आयुष्यक्रमाचें नि परिस्थितीचें माझें अध्य-यन अगदींच उथळ नाहीं असें सूक्ष्म दृष्टीनें पहाणाऱ्या अनुभवी 'तज्ज्ञां'ना आढळून येअील.

समाजांत नांवलौकिकाला चढणाऱ्या बुद्धिमान्, कर्तृत्ववंत अन् महत्त्वाकांक्षी व्यक्तींना स्वार्थसाधु, मत्सरी नि क्षुद्र बुद्धीच्या 'मित्रां'चा त्रास कसा सहन करावा लागतो नि क्षुल्लक गोष्टींच्या आधारानें 'पराचा कावळा' बनविण्याची समाजाची प्रवृत्ति कशी असते हें या नाटकांत दिग्दर्शित करण्याचा प्रयत्न केला आहे.

हें नाटक लिहितांना ज्या ज्या मंडळींनीं मला आत्मीयत्वानें आपापल्या अनुभावांचा लाभ दिला आणि सूचना केल्या त्यांचा मी आभारी आहें. दोन अडीच वर्षांपूर्वी मुंबअीकर रसिक स्त्रीपुरुष प्रेक्षकांनीं माझ्या नाटकांचा जो अपरंपार गौरव केला होता त्याविषयीं फिरून कृतज्ञता व्यक्त करून याही नाटकाचे ते सहर्ष स्वागत करतील अशी मी दृढ आशा बाळगतों.

१३ अेप्रिल १९३८
कर्नाटक हाऊस, मुंबअी.

प्रल्हाद केशव अत्रे

नाटकाच्या दुसऱ्या आवृत्तीमध्यें नाट्यास आवश्यक नसलेला कांहीं मजकूर गाळून टाकलेला आहे. त्यामुळें प्रयोगाच्या दृष्टीनें तें अधिक आटोपशीर झालेलें आहे.

१ जुलै १९५०
मुंबई ४

प्रल्हाद केशव अत्रे

## पात्रें :

(प्रवेशाच्या अनुक्रमानें)

| | |
|---|---|
| कौशिक | झावबा सामंत |
| कांता | रुस्मतजी गोलपिठा |
| कल्याण | जॉन सँटाक्रूझ |
| वासंती | अंबादास |
| वन्सी | गीता |
| भगवंतराव भांडूप | बाळाराम |
| मार्तंडराव मुलुंद | भाओलाल |
| भिकोबा भाअंदर | पेस्तनजी |
| अंबरनाथ पै | सुरंगी |

याशिवाय गडी, पोलिस, न्हावी, चंपीवाला अित्यादि

---

अंक १ : सायंकाळीं साडेपांच. कल्याणचें निवासस्थान.

अंक २ : प्रवेश पहिला—दुसऱ्या दिवशीं सकाळीं आठ. सरदारगृह.
प्रवेश दुसरा—त्याच दिवशीं सायंकाळीं. चर्चगेट रस्ता.
प्रवेश तिसरा—तिसऱ्या दिवशीं दुपार. मे. पेस्तानजी, भाओलाल कंपनीचें ऑफिस.

अंक ३ : प्रवेश पहिला—तिसऱ्या दिवशीं रात्र. चौपाटी.
प्रवेश दुसरा—तिसऱ्या दिवशीं सायंकाळ. चर्चगेट रस्ता.
प्रवेश तिसरा—चौथ्या दिवशीं सकाळ. भाओलालचें घर.

(प्रयोगाच्या सोयीसाठीं अंक ३ मधील प्रवेशवारीचा अनुक्रम बदललेला आहे.)

---

काळ : हल्लींचा; नाटकाचा सबंध कथाभाग बासष्ट तासांत घडलेला आहे.

स्थळ : मुंबअी

---

# पराचा कावळा

सायंकाळची पांच साडेपांचची वेळ. मरीन लाअीन स्टेशन समोरील 'सागर मॅन्शन' मधील चौथ्या मजल्यावरील कल्याणचें निवासस्थान. पडदा अुघडतांच कल्याणची आधुनिक साहित्यसामुग्रीनें शृंगारलेली बसण्याअुठण्याची खोली दृष्टीला पडते. अुजव्या बाजूला खोलींत शिरण्याचा मार्ग असून डाव्या बाजूला दोन जाळीच्या पडद्यांनीं झांकलेलीं दारें दिसत आहेत. अगदीं समोर दोन मोठ्या खिडक्या असून पलीकडे रस्त्याच्या बाजूकडे गॅलरी आहे. खिडक्यांतून रस्त्यापलीकडचें मोकळें मैदान व नंतर समुद्राचा देखावा दिसत आहे. सूर्य त्या बाजूला असल्यानें अून्ह अर्ध्या अुघड्या खिडक्यांच्या दारांतून खोलींत आलेलें आहे. कोपऱ्यांत एका लांकडी बैठकीवर 'रेडिओ' ठेवलेला असून, त्यांतून कांहीं तरी निरनिराळे विचित्र आवाज निघत आहेत. असा थोडा वेळ गेल्यानंतर

कांहीं वेळानें "टर्ऽऽटर्ऽऽ" अशी भेट–घंटा वाजूं लागते. आंतून कोणीच अुत्तर देत नसल्यानें घंटा फिरून जोरजोरानें वाजूं लागते. नंतर बाहेरचें दार अेकदम अुघडल्याचा आवाज होतो व आंत, पुढें कौशिक व मागें कांता अशीं प्रवेश करतात. कौशिक चोवीसपंचवीस वर्षांचा गुजराती तरुण असून कांता त्याच्यापेक्षां दोनतीन वर्षांनीं लहान असावी असें दिसतें. तीही गुजरातीच आहे व तिची वेषभूषा अगदीं अद्ययावत् पद्धतीची आहे. तिच्या हातांत अेक झोंकदार बॅग व बायकी छत्री आहे. कौशिकचा चेहेरा गांगरल्यासारखा दिसत आहे.

**कौशिक :** कोणीच दिसत नाहीं आंत ! बन्सी, अे बन्सी ! कुठं गेला हा नोकर ? ( कांता मागेंच आहे तिच्याकडे वळून ) कांता, ये ना आंत !

**कांता :** कोण रहातं अिथं ?

**कौशिक :** कल्याण–दुसरं कोण ? मीं सांगितलं नाहीं का कीं आपल्याला कल्याणच्या घरीं जायचं म्हणून ! कल्याण म्हणजे माझा अगदीं जानी दोस्त आहे ! अिथं आजूबाजूला सगळी पारश्यांची वस्ती आहे. आपल्या जातवाल्यांपैकीं ओळखीचं कोणी अिथं रहात असण्याचा संभवच नाहीं ! ( हातांतल्या घड्याळाकडे पाहून ) हे साडेपांच वाजताहेत आतां ! कल्याण यायची वेळ झालीच म्हणायला हरकत नाहीं. बस ना, अशी कां दिसतेस घाबरल्यासारखी ?

**कांता :** मी आणि घाबरणार ? मी घाबरट असतें तर घरदार सोडून तुझ्याबरोबर दूर परदेशीं जायला तयार झालें असतें होय ? आणि अेक महिना कुठं ओळख झाली नाहीं तोंच ! माझ्यापेक्षां तूंच खरा घाबरला आहेस हें कबूल कर ! टॅक्सींतून येतांना कसा चोरासारखा कोपऱ्यांत अंग चोरून बसला होतास.

**कौशिक :** वाटेंत कोणी आपल्या दोघांना पाहिलं असतं म्हणजे पाणीच पडलं असतं आपल्या सगळ्या बेतावर ! आतां अिथं आल्यावर माझ्या जिवांत जीव आला. बाकी दोनच दिवसांचा प्रश्न आहे म्हणा आतां ! परवांचे दिवशीं आफ्रिकेची स्टीमर निघते. अेकदां हिंदुस्थानचा किनारा सोडून आपण दर्यावर गेलों म्हणजे मग पहातों तुझा मामा अन् काका काय करतो तें !

**कांता :** वा, फारच शूर कीं नाहीं ? दर्यावर गेल्यावर म्हणे पाहातों ! ( कोचावर बसते. ) तहान लागली आहे मला कौशिक—

**कौशिक :** थांब, मी आंतून पाणी घेऊन येतों. या नोकराचा पत्ता नाहीं अजून !

[ डाव्या बाजूनें दारांतून आंत जातो. कांता बसल्या बसल्या चटकन् आपली बॅग अुघडते व त्यांतून पावडरची डबी काढून तोंडाला भरभर पावडर लावते व श्वास टाकून व डोळे मिटून कोचावर मान टाकते. अितक्यांत " सुनो सुनो बनके प्रानी ! " ही ओळ मोठ्यानें गुणगुणत कल्याण प्रवेश करतो. कल्याण हा सत्तावीस–अठ्ठावीस वर्षांचा तरुण असून त्याचा पोषाख मुंबअींतील अकडबाज तरुणाला शोभण्यासारखा आधुनिक आहे.

**कल्याण :** सुनो सुनो बनके प्रानी...

[ कांता अेकदम डोळे उघडून ताठ बसते व त्याच्याकडे वळून पहाते व भरकन् त्या गाण्याचा अुत्तरार्ध तिच्या तोंडांतून निघतो.

**कांता :** बनी हूं आज तुम्हारी रानी !

[ कल्याण अेकदम सर्द झाल्यासारखा जागचे जागीं खिळून अुभा रहातो व डोळे वासून कांताकडे पाहूं लागतो.

**कल्याण :** ( शेवटीं त्याच्या तोंडून शब्द अुमटतात. ) क–कोण–तुम्ही ?

**कांता :** ( थट्टेच्या सुरांत ) त–त–त तुम्ही कोण ?

**कल्याण :** मी मालक या जागेचा—

**कांता :** ( अेकदम अुभी राहून व हंसून ) कोण, कल्याण ?

**कल्याण :** तुम्ही ओळखतां मला ? मीं नाहीं तुम्हांला ओळखलं !

**कांता :** कमाल आहे तुमची ! परवां बॅंड-स्टॅंडवर आपण भेटलों–तुम्हीं मला घरचा पत्ता सांगितलांत–आणि आज यावेळीं मला अिथं ये म्हणून सांगितलंत— विसरलांत वाटतं तुम्ही ?

**कल्याण :** म्हणजे, काय म्हणतां काय तुम्ही ! मीं तुम्हांला आयुष्यांत पाहिलं नाहीं कधीं ! दुसरा कोणी तरी असेल खास ! तुम्ही पत्ता चुकलां आहांत !

**कांता :** मला तुम्हीं नांवानें हांक देखील मारलींत त्या दिवशीं !

**कल्याण :** काय, मी ?

---

सुनो सुनो बनके प्रानी इ० =' प्रभात 'च्या ' अमरज्योति ' बोलपटांतील लोकप्रिय गाणें.

बॅंड-स्टॅंड = कुलाबाच्या बाजूकडील बॅंडवादनाचें प्रसिद्ध स्थळ. येथें बॅंडवादनाचे वेळीं मुंबअींतील शुलहौशी तरुण स्त्रीपुरुष जमतात.

**कांता :** हो, हो; तुम्ही ! काय नांव आहे माझं ? ओळखा पाहूं !

**कल्याण :** तुमचं नांव ओळखायच्या आधीं मी तुमच्या मावशीच्या मुलीचं नांव लौकर ओळखेन—

**कांता :** (मोठ्यानें हंसून) तुम्हीं शक्यच नाहीं माझं नांव ओळखणं ! कां म्हणून नाहीं विचारलंत ?

**कल्याण :** कां ?

**कांता :** आपण भेटलोंच नाहीं जन्मांत कधीं ! थट्टा केली तुमची !

[ खूप हंसते.

**कल्याण :** [ ओशाळा होऊन ] पण—तुम्ही मलाच भेटायला आलांत ?

**कांता :** अर्थात्च—

**कल्याण :** पण माझ्याशीं काय असणार काम तुमचं ?

**कांता :** (बाजूच्या खोलीकडे हात दाखवून) ते सांगतील—

**कल्याण :** तें ! कोण ते ? आणि तुमचे ते आंत देखील शिरले का थेट !

[ तिकडे जाऊं लागतो तोंच हातांत पाण्याचा ग्लास भरून कौशिक येतो.

**कौशिक :** घरांत अेक ग्लास स्वच्छ सांपडेल तर—

**कल्याण :** हॅलो कौशिक ! यू ओल्ड बॉय् ! व्हाट अ सरप्राअिज् ! मला वाटलं—

**कौशिक :** काय वाटलं तुला ?

**कल्याण :** म्हटलं माझ्या घरांत दिवसाढवळ्या शिरणारा हा जंटलमन डाकू कोण असावा ? माझ्या तोंडचं पाणी पळालं—

**कौशिक :** (ग्लास पुढें करीत) मग पी हें ! (हंसून) तुझा नोकर नव्हता. हिला तहान लागली म्हणून पाणी आणायला आंत गेलों. कल्याण, लेका, बाहेर हा सगळा थाटमाट आणि आंत तुझं स्वयंपाकघर म्हणजे नुसता नळबाजार करून ठेवला आहेस कीं रे !

**कल्याण :** अरे बाबा, स्वयंपाकघराची मालकीण येअीपर्यंत हें असंच चालायचं ! ब्रह्मचाऱ्याच्या घरांत फार खोल कधीं शिरूं नये !

**कौशिक :** मग येणार कधीं ती तुझी स्वयंपाकघरची मालकीण ?

**कल्याण :** येअील—येअील—

---

जंटलमन डाकू=एका बोलपटाचें नांव; नळबाजार=जुन्यापुराण्या, मोडक्यातोडक्या वस्तूंचीं जेथें दुकानें आहेत अशी मुंबअीची अेक बाजारपेठ.

**कांता :** अहो, तुमच्या प्रेमाला आलाय पूर–पण माझं तोंड पडलं आहे अिकडं कोरडं !

**कौशिक :** सो सॉरी ! ( तिला चटकन् पाणी देतो. ) अे कल्याण, अिकडे ये, ओळख करून द्यायचं मी विसरलोंच ! ही आमच्या भावी स्वयंपाकघराची मालकीण–कारण सध्यां तर खाणवळींतच जेवतों आहें मी ! ( कांता त्याच्या गालावर चापट मारते. ) कांता, धिस् अिज् माय् पॅल् कल्याण !

**कल्याण :** ( तिच्याशीं हस्तांदोलन करीत ) आय् ॲम् ग्लॅड् ! कॉंग्रॅट्स्. माय् लॅड् ! ( कौशिकशीं हस्तांदोलन करतो. ) माफ करा अं कांताबेन, मघाशीं चुकून कांहीं बोललों—

**कांता :** वा, वा, तुम्ही काय बोललांत ? अुलट मींच ओळख नसतांना तुमची थट्टा केल्याबद्दल माफ करा मला.

**कौशिक :** म्हणजे, केव्हां झालं हें ?

**कल्याण :** तूं आंत होतास तेव्हां ! यांनीं आल्याबरोबर माझा चांगलाच फालुदा केला न् काय !

**कौशिक :** ती आहेच तशी ! नॉटी गर्ल ! बाकी तिला मी तुझ्याबद्दल किती वेळां तरी बोललों आहें, काय कांता ?

**कल्याण :** काय बुवा बदनामी करून ठेवली आहेस माझी तिच्याजवळ ?

**कौशिक :** मी तुझा दोस्त, तुझी बदनामी करणार होय ?

**कल्याण :** अरे, हल्लींच्या काळीं दोस्त लोकच फार बदनामी करायला लागले आहेत ! माझ्यासंबंधीं तर सध्यां भलभलत्या कंड्यांचं असं काहूर अुठलं आहे कीं, जिवलग दोस्तांचा देखील मला आतां विश्वास वाटेनासा झाला आहे ! कधीं कधीं तर वीट येतो या आयुष्याचा !

**कौशिक :** अे, शट्‌ अप् ! धिस् अिज नॉट् लाअिक ओल्ड कल्याण ! काय, झालंय काय तुला ? का ऑफीसमध्यें कांहीं तरी वाजलंय शेटशीं आज ?

**कल्याण :** ( अेकदम हंसून ) छेः, छेः, तसं कांहीं नाहीं ! अुलट आज तर मी अतिशय आनंदांत आहें.आजचा दिवस माझ्या आयुष्यांतला अत्यंत भाग्याचा आहे.

**कौशिक :** अुघडच आहे. आम्ही आलों नाहींत का ?

**कल्याण :** कौशिक, ( त्याला मिठी मारीत ) लेका, आज मी सॉलिसिटरची परीक्षा पास झालों !

**कौशिक :** ( त्याला कडकडून भेटत ) अँड ! कॉंग्रेच्युलेशन्स !

**कांता :** माझे मामा—

**कौशिक :** शट् अप्, थांब जरा! अतिशय आनंद झाला आपल्याला हें ऐकून. वास्तविक हा आनंद आपण आज ग्रीन्समध्यें जाऊनच साजरा करायला पाहिजे-पण मी आज आलों आहें तें निराळ्याच भानगडीसाठीं.

**कल्याण :** कसली भानगड?

**कौशिक :** बस खालीं. सांगतों तुला. (दोघे कोचावर बसतात.) तुझ्यासारख्या कायदेपंडिताकडे मी ऐका बेकायदेशीर कामांत साहाय्य मागायला आलों आहे. हिच्याशीं मीं लग्न करायचं ठरवलं आहे हें सांगितलं तुला. हिचा मामा आहे अतिशय श्रीमंत, तुझ्या माहितीचा-(ऐकदम थांबून) नाहीं-नाहीं-तुझ्या माहितीचा नाहीं-आणि त्याचें नांवठिकाणा सांगण्याची सध्यां जरूरीही नाहीं! त्याला ही आमची भानगड माहीत नाहीं. कारण मी बोलूनचालून कंगाल. आमच्या लग्नाला तो कधींच संमति देणार नाहीं. तेव्हां आम्हीं पळून जायचं ठरवलं आहे—

**कल्याण :** वा दोस्त! अन् कुठं?

**कौशिक :** आफ्रिकेला! मला 'युगँडा कॉटन ट्रेडिंग कंपनींत' महिना पांचशें शिलिंगांवर नोकरी मिळाली आहे तिकडे. परवांचे दिवशीं आफ्रिकेची स्टीमर निघते, तिनें आम्ही दोघे जाणार!

**कल्याण :** बहाद्दर प्रेमवीर दिसतो आहेस तूं! कौशिक, मला आजपर्यंत वाटत होतं कीं तुम्ही गुजराती लोक व्यापाऱ्याच्या कामांतच फक्त धाडसी आहांत! पण प्रेमाच्या भानगडींत एवढी धडाडी दाखवणारा बच्चा-ओ-गुजरात असूं शकेल याची मला कल्पना नव्हती! बरं मग, माझ्याकडून कोणत्या साहाय्याची अपेक्षा आहे तुला? स्टीमर सुटल्यानंतर हिच्या मामाच्या घरीं जाऊन त्याच्या हातांवर तुमच्या लग्नाचे पेढे ठेवूं म्हणतोस?

**कौशिक :** ऐ, बी सीरियस! हिचा मामा घरांत नसतांना मीं हिला परस्पर बाहेर काढली, ती थेट इथं घेऊन आलों! नाहीं तर परवांचे दिवसापर्यंत मी तिला ठेवणार कुठं? काय वाटेल तें करून दोन दिवस तरी आमच्यासाठीं एवढी गैरसोय सोसायला पाहिजे तुला!

---

ग्रीन्स = 'गेटवे ऑफ ऑंडिया' समोरील ऐक प्रसिद्ध आंग्ल पद्धतीचें भोजनगृह.

**कल्याण :** छट्, गरसोय कसली त्यांत! माझं घर तुम्हांला अुघडंच आहे नेहमीं!

**कौशिक :** दोन दिवसपर्यंत ती इथं आहे याचा पत्ता लागतां कामा नये कोणाला! नाहींतर बडबडशील पिण्याच्या भरांत कोणाशीं तरी—

**कल्याण :** ही–हीच दोस्त लोक करतात ती बदनामी! लेका, मला पितांना पाहिलंस तरी का कधीं? गेल्या वर्षाचा नाताळ विसरलास वाटतं अितक्यांत?

**कांता :** काय झालं गेल्या नाताळांत?

**कौशिक :** (गोंधळून) कांहीं नाहीं! तें निराळं आहे आमचं! तें कांहीं असो. पण हिच्याबद्दल काय वाटेल तें झालं तरी कोणापाशीं बोलणार नाहीं असं वचन दे. नाहीं तर तुझा स्वभाव आहे भाबडा!

**कल्याण :** यू ओडियट्, हें घे वचन—

[ त्याला वचन देतो.

**कौशिक :** (उठत) थँक्यू सर! आतां मी बाहेर जाअून येतों! मला अजून सारी सारी व्यवस्था करायची आहे बाबा! तूं जाणार नाहींस ना कुठं बाहेर?

**कल्याण :** कांहीं सांगतां येत नाहीं! जाअीनही कदाचित्! पण मी यांना आंत स्वतंत्र खोली देऊन ठेवतों म्हणजे झालं! कांताबेन, या इकडे—

[ तिघे डाव्या बाजूच्या खोलींत जातात. थोड्या वेळानें कल्याण व कौशिक बाहेर येतात.

**कल्याण :** मी म्हणतों अितक्या दिवस दडी देअून कुठं बसला असावा हा कौशिक? ह्या भानगडी चालल्या होत्या काय तुझ्या? अे, विचारूं का अेक? माफ कर अं, हें तरी तुझं नक्की ठरलं ना आतां?

**कौशिक :** म्हणजे काय?

**कल्याण :** तुझ्या प्रेमाचा जावक नंबर सातवा आहे हा! दर प्रकरणांत शेवटच्या घटकेला सगळा विचका करून टाकतोस!

**कौशिक :** छट्, त्या मागल्या भानगडींत कांहींच जीव नव्हता! हें प्रकरण अगदीं निराळं आहे. कल्याण, अशी मुलगी आयुष्यांत मला कधीं भेटली नव्हती! भयंकर रोमँटिक आहे—काय सांगूं तुला!

**कल्याण :** तें मी तिला पाहिल्याबरोबरच ताडलं! माझं म्हणणं अेवढंच कीं जन्माचे संबंध जोडतो आहेस तिच्याशीं—नीट विचार केलेला असावा!

**कौशिक :** जन्माचे संबंध ! मी व्यापाऱ्याचा बच्चा आहें ! जन्माचे संबंध-विबंध आपल्यापाशीं कांहीं नाहींत ! जोंपर्यंत पटेल तोंपर्यंतच टिकेल ! ज्या दिवशीं थटेल त्या दिवशीं अेक घाव दोन तुकडे ! आणि आफ्रिकेला गेल्यावर हिच्याशीं लग्न केलंच पाहिजे असं कांहीं नाहीं !

**कल्याण :** अे, हळूं. अैकेलना ती ! काळीज आहे का तुला ?

**कौशिक :** कसं असणार ? अितक्या वेळीं प्रेमपाशांत पडून झिजून गेलं आहे बहुतेक ! माफ कर, थट्टा केली नुसती ! या वेळीं मी खरोखरच सीरियस् आहें. जाऊं मी ? दोन तासांत येतों परत. तिच्यावर लक्ष असूं दे—तूं नसलास तर नोकराला सांगून ठेव. थोडीशी चक्रम आहे ती, म्हणून म्हणतों.

[ जातो.

**कल्याण :** (स्वतःशींच अर्धवट हंसत) थोडीशी चक्रम आहे काय ? ( अेकदम कपडे काढायची त्याला आठवण होते, तसा कोट आंत ठेवून येतो, व नेकटायची गांठ सोडतांना गुणगुणूं लागतो ) सुनो सुनो बनके प्रानी—

[ खोलींतून कांता एकदम बाहेर येते.

**कांता :** बनी हूं आज तुम्हारी रानी—! ( कल्याण थांबतो. तशी ती त्याच्याकडे पाहून मोठमोठ्यानें हंसूं लागते ) गेला कौशिक ?

**कल्याण :** आतांच !

**कांता :** गाणं कां थांबविलंत ?

**कल्याण :** हें पहा, तुम्ही आंत बसा ना जरा. बाहेर अिथं माझ्याकडे कोणी येण्याचा संभव आहे.

**कांता :** मी नाहीं बसत आंत अेकटी ! तुम्ही येत असाल तर—

**कल्याण :** छेः, छेः, मी अिथंच बसणं बरं !

**कांता :** मग मीही अिथंच बसणार ! मला तुमचं गाणं अैकायचं आहे—

**कल्याण :** छेः छेः ! मला गाणबिणं कांहीं येत नाहीं ! कांहीं तरी गुणगुणत होतों झालं. मला का गळा आहे ?

**कांता :** किती लबाड आहांत तुम्ही ! अितका गोड गळा आहे न् म्हणे मला गळा आहे का ? म्हटलंच पाहिजे तुम्हीं तें गाणें.

**कल्याण :** नाहीं हो, अन् शिवाय माझं डोकंही दुखतंय् बरंच !

**कांता :** खरंच ? मग याना अिथं म्हणजे मी तुमचं डोकं दाबतें.

**कल्याण :** भलतंच ! कोणी आलं तर काय म्हणेल ?

**कांता :** कोणी आलं तर ना ! बाहेरचं दारच लावून टाकतें, म्हणजे कोणी येतंय् कशाला ?

[ बाहेर जाऊं लागते.

**कल्याण :** थांबा, माझ्याकडे मंडळी येणार आहेत. दार उघडंच असूं द्या.

**कांता :** ( थांबून त्याच्याकडे पहात ) खरं सांगा, लाजतांय ना तुम्ही मला ?

**कल्याण :** छेः छेः, तसं कांहीं नाहीं—

**कांता :** मग असे घेरी आल्यासारखे अिकडे तिकडे डोळे काय फिरावितां आहांत मघांपासून ? माझ्याकडे बघतही नाहीं नीट !

**कल्याण :** बायकांशीं बोलायची मला संवय नाहीं फारशी !

**कांता :** तर—तर—जसं कांहीं कोणाला खरंच वाटेल ! पक्के मुंबईचे दिसतां आहांत—

**कल्याण :** मुंबअीचे कोण ?

**कांता :** ( हंसून ) भामटे—

**कल्याण :** भामटे पुण्याचे प्रसिद्ध आहेत—मुंबअीचे नाहींत !

**कांता :** ( विजारीच्या खिशांतून डोकावणाऱ्या तांबड्या रेशमी रुमालाचें टोंक अेकदम फर्रकन् ओढून ) हा रुमाल कुणी दिला तुम्हांला, सांगा पाहूं ?

**कल्याण :** कुणी नाहीं ! माझाच रुमाल आहे तो !

**कांता :** तुमचाच आहे ना ?

[ त्याचा वास घेऊं लागते.

**कल्याण :** चांगला नाहीं तो—

**कांता :** ( त्याचा वास घेत ) किती सुंदर वास येतो आहे याला ! असूं द्या मजजवळ. किती हौशी आहांत तुम्हीं ? खरंच, तुमचा स्वभाव अेकदम मला भारी भारी आवडला !

**कल्याण :** ( विषय बदलण्यासाठीं ) हें बघा, तुम्हांला आफ्रिकेला जायचंय ना आतां ! तेव्हां त्या देशाची माहिती तुम्हांला नसली तर मी सांगतों ! आफ्रिका खंड हा युरोप व आशिया खंडाच्या दक्षिणेला असून त्याच्या पूर्वेला अरबी समुद्र, दक्षिणेला हिंदी महासागर, पश्चिमेला—

**कांता :** अहो, अक़्लेचे महासागर, थांबा थांबा ! म्हणजे आम्ही आफ्रिकेला जाणार असं तुम्हांला खरंच वाटलं कीं काय ? अगदींच हे—आहांत कीं !

[ मोठ्यानें हंसते.

**कल्याण :** म्हणजे, परवांचे दिवशीं तुम्ही आफ्रिकेला जाणार ना ? स्टीमर देखील ठरली ! मलाच बनवितां काय ?

**कांता :** तो कौशिक सांगणार आणि तुम्ही अैकणार ! सगळ्या गांवचा थापाड्या तो ! अुत्तर ध्रुवावर जायला तयार झाला तो तरी त्याला पांच पैसे कोणी देणार नाहीं ! पांचशें शिलिंगांची नोकरी ठेवली आहे त्याच्या काकानं !

**कल्याण :** म्हणजे, त्यांनीं सांगितलं तें सगळं खोटं !

**कांता :** अर्थातच् !

**कल्याण :** पण हें सगळं नाटक करायचं कारण काय ?

**कांता :** घटकाभर गंमत, दुसरं काय ? या मुंबअीच्या आळणी आयुष्याचा कधीं कधीं असा कंटाळा येतो, तेव्हां असलाच कांहीं तरी कल्पनेचा रोमान्स करावा लागतो मधून मधून !

**कल्याण :** अरे, पण तुम्हांला रोमान्सच करायचा होता तर कुलाब्याच्या दांडीपासून जुहूच्या झाडीपर्यंत सारी मुंबई मोकळी होती कीं तुम्हांला ! माझ्याच खोलींत तुमचा रोमान्स धडपडायला कशाला आला ? अजब प्राणी दिसतां तुम्हीं ! बरं, तुमचं लग्न ठरलं आहे तें तरी खरं आहे काय ?

**कांता :** अिथं येईपर्यंत तें खरं होतं ! पण आतां अिथं आल्यानंतर—

**कल्याण :** बस करा फाजिलपणा ! वेड लागलंय तुम्हांला !

**कांता :** तुम्हांला पाहिल्यानंतर कुणाला वेड लागणार नाहीं ?

**कल्याण :** जातां कीं नाहीं तुम्हीं खोलींत त्या ! नाहींतर तुम्हांला अुचलून मी आंत ठेवीन.

**कांता :** ओ, हाअु चार्मिंग ! अुचला मला.

**कल्याण :** तुम्हांला अुचला ! छान ! तुम्हांला अुचलायचं म्हणजे बोरीबंदरवरचे चार हमाल आणावे लागतील. व्हा आंत आधीं !

**कांता :** संध्याकाळीं घरांत बसायची संवयच नाहीं मला मुळीं ! चला, आपण पिक्चरला जाअू. आज ती 'बनकी चिडीया' आहे.

**कल्याण :** कौशिक येअीपर्यंत मी तुम्हांला येथून पाअूलही हलूं देणार नाहीं ! तुमच्यावर नजर ठेवायला त्यांनीं मला मुद्दाम सांगितलं आहे.

---

कुलाब्याची दांडी = कुलाब्याचें दीपगृह. जुहू = मुंबअीपासून वीसअेक मैलांवर असलेलें रमणीय समुद्रकांठचें स्थळ.

बोरीबंदर = मुंबअीचें जी. आय्. पी. रेल्वेच्या फांट्याचें प्रसिद्ध विरामस्थान.

**कांता :** सांगितलं आहे ना ? मग झालं तर ! तेंच तर मी म्हणतें आहे ! तुम्ही मला पिक्चरलाही नेत नाहीं आणि नजरही ठेवीत नाहीं माझ्यावर नीट !

**कल्याण :** शर्थ झाली आतां ! ( अेकदम विचार करून ) हो–हो आलों अं ! आंत जा आधीं, कोणी तरी आलंय ! ( दारापर्यंत घाअीनें जातो व बावरा चेहरा करून परत येतो. ) अरे बापरे, कोणीतरी गुजराती गृहस्थ पोलीस घेअून आला आहे !

**कांता :** मामा असेल माझा—

**कल्याण :** हो, हो, मामाच तुमचा ! पळा तुम्हीं आंत ! ( कांता खोलींत जाते. त्याबरोबर कल्याण अेकदम दार लावून घेतो. दाराला कडी लावीत व स्वतःशींच दांत खात ) शेवटीं मामाची मात्रा लागू पडली ! आतां खुशाल बघत बस आंतल्या अंधारांत ' वनकी चिडीया ' ! ( कोचावर हुशहुश करीत बसतो. ) हा कौशिक लेकाचा येणार तरी केव्हां ? तोंपर्यंत ही आफ्रिकेची हुंडी संभाळत बसावं लागणार कीं काय ? ( अितक्यांत बाहेरून ' कल्याण ' अशी हांक अैकूं येते. कल्याण अेकदम अुठून ताठ अुभा राहतो. ) अरे बापरे, वासंती आलीच वाटतें ! आतां मेलोंच !

[ वासंती लगबगीनें येते. तिचें वय वीस-अेकवीस वर्षांचें असून तिनें अत्यंत भपकेबाज शृंगार केलेला आहे.

**वासंती :** कल्याण, डार्लिंग—

**कल्याण :** वासंती, माय क्वीन ! ( दोघे अेकमेकांना प्रेमानं मिठी मारतात ) किती दम लागला आहे तुला ? खालीं बस.

**वासंती :** दोन दोन पायऱ्या अुड्या मारीतें आलें ना जिन्यावरून ! कधीं मेटन असं झालं होतं !

**कल्याण :** दोन वाजतां मी तुझ्या कॉलेजांत टेलिफोन केला होता. कोणी तरी घेतला. दुपारभर कांहींच जबाब आला नाहीं तेव्हां म्हटलं काय झालं हिला कोणास ठाअूक ? आतां मी थोड्या वेळानं तुझ्या वसतिगृहांत येणारच होतों—

**वासंती :** तो आमच्या कॉलेजांतील कारकून मेला भारी वाअीट आहे. मुलींना आलेलीं पत्रें नि टेलिफोन वेळेवर देतच नाहीं मुळीं ! तशांतून आज आमच्या कॉलेजचें गॅदरिंग होतें—



---

वनकी चिडीया = अेका बोलपटाचें नांव.

**कल्याण :** म्हणून हा अेवढा थाटमाट केला आहे वाटतं? काय अँड दिसते आहेस म्हणतेस—

**वासंती :** थांबा ना—चार वाजतां मला तुमचा टेलिफोन आलेला कळला—अन् तुम्ही परीक्षा पास झाल्याचें समजलें. असा आनंद झाला म्हणतां—त्याच क्षणीं तुमच्याकडे धांवत यावें असें वाटलें—पण त्या वेळीं आमच्या गॅदरिंगच्या प्रेसिडेंटचा अॅड्रेस अन रंगांत आला होता. असं कंटाळवाणं चऱ्हाट लावलं होतं मेल्यानं! मनांतून त्याला लाख शिवी दिली असेल मीं! साडेपांच वाजले सारं संपायला! तशी धांवत बाहेर सुटलें—स्टँडवर आलें तर दहा मिनिटं 'बस'च नाहीं! अेक अेक मिनीट मला तासातासासारखें वाटत होतें. शेवटीं आली मेली अेकदांची बस! आंत शिरतें तर जागाच नाहीं! अितके ठोले बसले होते आंत—चार दक्षिणीही होते त्यांत! पण अेक अुठून मला जागा देअील तर शपथ! शेवटीं मी टॅक्सी करून आलें. टॅक्सीवाल्याजवळ मोड नव्हती आणि खालचा लिफ्टवाला कुठं गेला होता भटकायला, म्हणून आणखी दहा मिनिटं गेलीं त्यांत—असा दम लागला म्हणतां—

[ धांपा टाकते.

**कल्याण :** दम लागला म्हणतेस, आणि वर बडबडतेसही आणखी! दोन मिनिटांत अितकी बोललीस कीं तुझ्या तोंडाला मीटर असतें तर दहा आणे बिल झालं असतं! मीट तोंड—

**वासंती :** नाहीं मिटत जा! आज मला अतिशय आनंद झाला आहे! वाटेल तितकें मी बोलणार! तुमच्या गळ्याला मिठी मारून नाचणार! आणि तुमचा हात धरून तुमच्याभोंवतीं गरगर रिंगण घालणार!

थय थय नाचत गाअुं राया,
दिलवर या, या । सारी दुनिया । हांसवुं या!
नाचति वारे, नाचति तारे,
मंजुळवाणी गाति पांखरें,
खळबळ दरिया, करितो अुरिं या,
गरगर राया, नाचूं या या!

---

बस = सार्वजनिक वाहातुकीची मोटारगाडी. लिफ्टवाला = विजेचा पाळणा वरखालीं नेणारा माणूस.

**कल्याण :** म्हणजे, परीक्षा मी पास झालों आहे का तूं ?

**वासंती :** तुम्ही नाहीं मी ! तुमच्या परीक्षेच्या निकालावरच माझ्या परीक्षेचा निकाल अवलंबून होता. जन्माच्या जोडीदाराची अुत्तम निवड करणें ही नायकांच्या आयुष्यांतली परीक्षाच नाहीं तर काय ? आतां काका आले म्हणजे मी तुम्हांला त्यांच्यापुढें अुभं करून कबूल करायला लावीन कीं, मी या परीक्षेंत अुत्तम तऱ्हेनें पास झालें कीं नाहीं ?

**कल्याण :** अरे बापरे, केव्हां येणार आहेत तुझे काका ?

**वासंती :** खरं पाहतां आजच ते यायला पाहिजेत होते. परवांच मी त्यांना मनाचा धडा करून हें शेवटीं कळविलं सारं. कोल्हापुराहून आज तरी त्यांची तार यायलाच पाहिजे.

**कल्याण :** मग तुला गेलंच पाहिजे वसतिगृहांत ! हो तिथं तारबीर आली असेल तुझ्या काकांची ! चल, मीहि येतों तुझ्याबरोबर !

**वासंती :** थांबा, तुम्ही मागून या, मी आधीं जातें. काका तिथं अेकादे वेळ येअून बसलेले असायचे. त्यांना आपण दोघे बरोबर आलेले आवडायचें नाहीं. निदान पहिल्या दिवशीं तरी त्यांना हा धक्का नको ! तुम्ही अर्ध्या तासानं पोषाख करून या, म्हणजे मग तुमची त्यांच्याशीं ओळख करून देईन. बाकी काका येवोत वा न येवोत ! आज 'रीगल'ला गार्बोचें पिक्चर आहे. आजची संध्याकाळ आनंदांत घालवायलाच पाहिजे ( खोलींत खडबड वाजूं लागते, तसा कल्याण घाबरून तिकडे पहातो. ) नाहीं का ?

**कल्याण :** ( तोंडावर हास्य आणून ) हो–हो–अगदीं जरूर ! म्हणजे मी देखील तेंच तुला सांगणार होतों.—

**वासंती :** बरं का कल्याण, सॉलिसिटरची परीक्षा अेक वेळ पास होणं सोपें आहे; पण आमच्या काकांच्या परीक्षेंतून पास होणें महा कर्मकठीण आहे ! ( खोलींत जास्त आवाज होतो. कल्याण घाबरल्यासारखें करतो. ) कां हो, काय झालं ?

**कल्याण :** तें तुझ्या काकांचें नांव काढलें कीं माझ्या अंगावर कांटा अुभा रहातो !

**वासंती :** ( खोलीकडे बघून ) काय वाजतंय आंत त्या खोलींत !

**कल्याण :** कांहीं नाहीं ! घूस असेल ! या घुशींचा फार त्रास !

**वासंती :** चवथ्या मजल्यावरसुद्धां ?

---

रीगल=कोटांतील प्रसिद्ध बोलपट मंदिर; गार्बो=ग्रीटा गार्बो ही प्रसिद्ध सिनेमानटी.

कल्याण : मुंबईच्या मुशी आहेत त्या? मोठ्या फॅशनेबल असतात! त्यांना उंच मजल्यावर राहणं फार आवडतं!

वासंती : मला नव्हतं माहीत! (खोलींतून " सुनो सुनो बनके प्रानी " असा गाण्याचा सूर उमटतो) सुनो सुनो बनके प्रानी!

कल्याण : (मोठ्या मसड्या आवाजांत) आधीं बीज एकलें। रोप अंकुरलें। आधीं बीज एकलें—

वासंती : कोण म्हणालें गाणें आंतून?

कल्याण : आंतून नाहीं-पलीकडच्या इमारतींतून-तिथं 'प्रभात कंपनी'ची एक माजी नटी राहते-सकाळ संध्याकाळ ओरडत असते खाली! (आंतून पुन्हां त्याच गाण्याचे सूर) आधीं बीज एकलें! रोप अंकुरलें। रोप वाढलें

वासंती : अेकदम तुकाराम कोठून संचारला तुमच्या अंगांत?

कल्याण : तुकारामाचे अभंग म्हटल्यानंतर मनाला पवित्र वाटतें. तशांत परीक्षा पास झाल्यामुळें मला असा आनंद झाला आहे कीं एकसारखें तोंडाला येईल तें गात सुटावेंसे वाटतें-'आधीं बीज अेकलें!' तूं जा-नाहीं तर 'रीगल'ला जायला उशीर होईल आपल्याला. येतोंच मी अर्ध्या तासांत!

वासंती : बरं तर-चला, पोहोंचवा खालीं मला! (जाऊं लागते. तों कांताची छत्री तिला दिसते) म्हणजे, ही कोणाची छत्री?

कल्याण : (अेकदम स्तंभित होतो, पण तावडतोब चेहरा बदलून) हात्तीच्या! हा त्या शेजारच्या कारट्याचा उद्योग!

वासंती : कोण शेजारचें कारटें?

कल्याण : अेक पारशाचें पोरगें ग! पलीकडच्या फ्लॅटमध्यें राहतें. रोज आपल्या आओीची छत्री घेऊन खेळत अिथं येतें आणि नेमकी छत्री विसरून जातें.

वासंती : (अेकदम थांबून) तुमचा चेहरा मला चमत्कारिक दिसतो आहे जरा! बरं वाटतं आहे ना?

कल्याण : अगदीं उत्तम! मनुष्याला आयुष्यांत अतिशय आनंद झाला म्हणजे असा अुलट परिणाम होतो कधीं! चल—

---

आधीं बीज अेकलें इ०='तुकाराम' बोलपटांतील अेक लोकप्रिय अभंग.

[ तिला घेअून बाहेर जातो व थोड्या वेळानें परत येतो. खोलीचे दरवाजापाशीं जाअून दांतओठ खातो व मुठी वळवीत 'बनकी चिडीया!' असें पुटपुटतो. मग दरवाजाची कडी अुघडून हळूच डोकावून पाहतो.

झोपली वाटतें? अितक्यांत गात होती, आणि अितक्यांत झोपली! खरींच चक्रम आहे! (दार हलकेंच ओढून घेतो, अितक्यांत बन्सी येतो.) कुठं गेला होतास मरायला अितका वेळ?

**बन्सी :** कुठं नाहीं! वाण्याच्या दुकानांतून सामान आणायचं होतं—

**कल्याण :** सामान आणायला अितका वेळ? खोटं बोलतोस, शेजारच्या त्या खिस्ती अय्याबरोबर फाजिलपणा करीत बसतोस, नाहीं का सारा वेळ? खबरदार अिथून हललास तर!

[ बन्सी मान खालीं घालून जाअूं लागतो; अितक्यांत "कल्याण आहत काय?" अशी मोठ्या आवाजांत हांक व लागलेच "आहेत हो,–या मंडळी!" असे शब्द अैकूं येतात व नंतर सर्वांच्या पुढें भगवंतराव भांडूप, मार्तंडराव मुलुंद, भिकोबा भाअिंदर, अंबरनाथ पै, झावबा सामंत, रुस्तुमजी गोलपिठा आणि जॉन सँटाक्रूझ अशी मंडळी अेका पाठीमागून अक आंत येतात. हे सर्व मेसर्स पेस्तनजी आणि भाअीलाल, सॉलिसिटर्स, या कंपनीमध्यें निरनिराळया हुद्यावर नोकर आहेत. कल्याण हंसरा चेहेरा करून पुढें होतो व प्रत्येकाचें हस्तांदोलन करून स्वागत करतो.

**कल्याण :** ओहोहो, या भांडूप, मग मुलुंदही असलेच पाहिजेत! अरे वा, भाअिंदर! या अंबरनाथ, झावबाही आहेतच का? भले पधारो, गोलपिठा, हॅलो सँटाक्रूझ! वेलकम् ऑल! आज म्हणजे आपल्या पेस्तनजी आणि भाअीलाल कंपनीचें अर्धे ऑफीसच आमच्या घरीं आलें म्हणायचें!

**भांडूप :** अहो, आतां अर्धं काय, यापुढें सगळें ऑफीसच तुमच्या घरीं येत जाणार!

**झावबा :** आजपासून तुमचा सारा जमानाच बदलला!

**मुलुंद :** आतां तुम्ही पेस्तनजी अॅन्ड भाअीलालमधील आर्टिकल्ड क्लार्क नसून स्वतंत्र सॉलिसिटर झालां आहांत!

**भाअिंदर :** तुम्ही आपल्या फर्मचे पार्टनर होणार आतां—

**अंबरनाथ :** यापुढें आपल्या फर्मचें नांव मेसर्स पेस्तनजी, भाअीलाल अॅन्ड कल्याण, सॉलिसिटर्स!

**कल्याण :** अरे, काय तुम्हीं लोकांनीं माझी थट्टा मांडलीत ! सॉलिसिटरची परीक्षा पास झालों मी म्हणजे राजाभाअी टॉवरच्या शिखरावर जाअून बसलों कीं काय ?

**भांडूप :** तुम्हांला त्याचें महत्त्व नसलें तरी आम्हाला वाटतें ना ! जाअू द्या ! तो वाद कशाला ! आम्हांला पार्टी कधीं देणार तें बोला—

**मुलुंद :** कधीं काय ? अरे, आतां पाहिजे आपल्याला ! म्हणून तर आपण सारे आलों अिथं.

**सँटाक्रूझ :** वुअि मस्ट अेन्जॉय धिस् अिव्हनिंग वुअिथ् यू !

**माअिंदर :** तसं कशाला, तुम्ही थांबा अिथं ! मी वाळा भागवताच्या खाणावळींत ऑर्डर देअून येतों. तो आमच्या गांवचा आहे.

**मुलुंद :** अे कोकण्या लेका, कांहीं अक्कल आहे कीं नाहीं तुला ? सॉलिसिटरची परीक्षा पास झाल्याची पार्टी कुठं वाळा भागवताच्या खाणावळींत देतात होय रे ! दादर बारशिवाय मजा यायची नाहीं आज !

**अंबरनाथ :** वा मुलुंद ! खूप टेस्ट आहे तुमची ! म्हणे दादर बार ! जन्माच्या कर्माला कुठें हॉटेलांत गेले ते दादर बारमध्यें शिरले—ग्रीन्स—मॉजिनी—पिअर्स—सायरो—हीं नांवें तरी कधीं अैकलीं होतीं का बापजन्मीं !

**भांडूप :** त्यापेक्षां त्या कुलाब्याला नवीन चिनी होटेल निघालें आहे म्हणतात तिथें जाअूं ! तिथें झिंगे फार छान मिळतात म्हणे ! आणि अितक्या लांब गेलें म्हणजे कोणाला पत्ताही लागायला नको !

**गोलपिठा :** } **सांताक्रूझ :** } दॅट्स् जॉली फाअिन आयडिया !

**झांबवा :** हें पहा, माझं म्हाताऱ्याचं अैकतां का थोडं ! घड्याळांत आधींच वाजले आहेत सव्वासहा. आतां कुठं दादर बार आणि चिनी हॉटेल करीत बसलां आहांत ? जायलाच लागेल अेक तास ! आणि आपल्याला नाहीं आतां दम—

---

राजाभाअी टॉवर=मुंबअी विश्वविद्यालयाच्या प्राकारांतील अेक अुंच मनोरा. वाळा भागवत=गिरगांवांतील अेक जुनी व प्रसिद्ध दक्षिणी खाणावळ. दादर बार=दादर जी. आय्. पी. रेल्वेच्या स्टेशनाशेजारील अेक लोकप्रिय मद्यमांसाहार गृह. मॉजिनी, पिअर्स, सायरो हीं अनुक्रमें कोट, प्रिन्सेस् रस्ता, कुलाबा रस्ता येथील प्रसिद्ध अुच्चवर्गीय मद्यमांसाहारगृहें आहेत. चायनीज हॉटेल=हें चिनी पद्धतीचें मद्यमांसाहार गृह कुलाब्याला आ—होतें !

**भांडूप :** म्हणणं काय आहे तुमचं !

**मुकुंद :** आणि शिवाय हल्लीं हॉटेलंही बंद होतात बरोबर अकरा वाजतां !

**गोलपिठा :** हे–हे तुमच्या ते कॉंग्रेस गव्हमेंट !

**झावबा :** तेव्हां मी म्हणतों, अिथंच होअूं द्या काय व्हायचें तें ! खालीं दुकानही आहे पेट्रोलचें–तेव्हां आतां कां विलंब करतां विनाकारण ?

**मुकुंद :** अुत्तम कल्पना ! अगदीं बेस्ट ! जीते रहो सामंतभाअी !

**गोलपिठा :** हा झावबा साला घरडा आहे पण लअी माथ्याचा आहे.

**भांडूप :** म्हातारीं माणसें वाया जायचीं नाहींत ! बोला कल्याण, पसंत आहे ना कल्पना ?

**कल्याण :** अरे, पण तुम्हीं मला बोलून तर द्याल ! हें पहा दोस्त, मला अर्ध्या तासापेक्षां जास्त वेळ नाहीं ! अेक अेंगेजमेंट आहे जरूरीची ! तेव्हां पुढें केव्हां तरी—

**भांडूप :** डोन्ट् पुट् ऑफ टिल् टुमारो, व्हॉट यू कॅन् डू टुडे !

**झावबा :** पुढें केव्हां तरी ! मग आपली कंबरच खचली ! मेलों अगदीं ! अे कल्याण, दुसरें कांहीं राहूं दे पण निदान अेक बीअरची बाटली दिली नाहींस तर हा झावबा सामंत अुभ्या पायांनीं कांहीं खालीं अुतरत नाहीं !

**अंबरनाथ :** कल्याण, तुम्ही आज पार्टी द्या, अुद्यांची पार्टी माझी. मग तर झालं ! काल मोठ्या अॅक्सिडेंटमधून वांचलों ना मी !

**कल्याण :** कुठं गेला होतास मरायला काल ?

**अंबरनाथ :** म्हणजे, तुम्हांला सांगितलं नाहीं का या लोकांनीं ! म्हणजे असं झालं, काल दुपारीं टॅक्सींतून चाललों होतों. बरोबर होती अेक लांबची बहीण—

**मुकुंद :** बहीण ! काय खोटं बोलतो आहेस साल्या ! मरतां मरतां वांचलास, आतां तरी खरं बोल !

**अंबरनाथ :** बहीण म्हणजे माझी स्वतःची नाहीं रे, दुसऱ्या कुणाची तरी ! आम्ही शेजारीं शेजारीं बसलों होतों–कांहीं करत नव्हतों—

**मुकुंद :** बोललास पुन्हां खोटं ! लाज वाटत असली तर मी सांगतों पुढचं–आंतमध्यें या दोघांची चालली होती–पण तें ‘नाहीं मी बोलत आतां !’ आणि

---

झिंगे = Prawns: भक्षणीय मत्स्यसदृश प्राणी. घरडा = म्हातारा. बीअर = अेक लोकप्रिय अंमली पेय. अरेरे, हेंही आतां सांगावें लागतें.

ड्रायव्हर बचत होता ती गंमत पुढच्या आरशांतून! समोरून ट्राम आली ती त्याला दिसली नाहीं! असा भयंकर ॲक्सीडेंट झाला म्हणतां! मोटारचा चुरा झाला! आणि यांची ती लांबची बहीण तिथल्या तिथं खलास झाली!

**अंबरनाथ :** पण मी तर बचावलों कीं नाहीं? म्हणून म्हणतों, अुद्यां आपली पार्टी नक्की.

**भांडूप :** बस, बस, बस! आतां बोलूं नका! हें अगदीं ठरलं! आज कल्याणची पार्टी आणि अुद्यां अंबरनाथची!

**कल्याण :** आतां तुमचा अेवढा आग्रहच असेल तर नाअिलाज आहे. पण अर्ध्या तासानंतर मला कांहीं अिथं थांबतां यायचं नाहीं.

**झावबा :** अर्धा तास तर अर्धा तास! सुरू तर होअूं द्या, अर्ध्याचे मग होतील अडीच तास! आपला ठोकताळा आहे!

**भांडूप :** आणि कल्याण अर्ध्या तासानें गेले म्हणून मी म्हणतों आपल्याला अिथं बसायला काय हरकत आहे?

**मुलुंद :** मुळींच नाहीं? कल्याण न् आपण काय दोन आहोंत? त्याचं घर तें आपलंच घर!

**झावबा :** अरे, बोलताय काय? मागवा ना—

**कल्याण :** काय पाहिजे तें तुम्हीं मागितल्याशिवाय मी तरी काय आणणार?

**भांडूप :** खरं सांगूं कल्याण, तुम्हीं दोस्त लोकांसाठीं भारी पैसा खर्च करतां. आपल्याला नाहीं तें पसंत! तुम्ही फार पैसे खर्च करावेत अशी आमची इच्छा नाहीं! आतां तुम्ही फर्मचे पार्टनर झाल्यानंतर आम्हांला तुमच्याकडून नेहमींच पार्ट्या मिळत जाणार. आजच तुमच्याकडून आम्हांला सगळं मिळायला पाहिजे असें थोडेंच आहे.

**मुलुंद :** आणि तसे आम्ही नेहमींचे पिणारे थोडेच आहोंच! तुम्ही अेवढी परीक्षा पास झालांत. अतिशय आनंद झाला आम्हांला, म्हणून आम्हीं थोडी मजा करणार झालं! भांडूप, घ्या हा कागद, करा यादी!

[ भांडूप कागद घेऊन यादी करतो.

**कल्याण :** बन्सी, ( बन्सी येतो. ) हे घे, खालच्या दुकानांतून घेअून ये माझ्या नांवावर—

**मुलुंद :** ( झावबाला ) खातं आहे म्हटलं—अुगाच नाहीं!

**भांडूप :** अन् बारा सोड्याच्या बाटल्या–दोन जिंजर, एक सिगारेचा डबा—

[ बन्सी कागद घेऊन जातो.

**मुलुंद :** अन् खायला ?

**भांडूप :** तर तर—प्यायला अन् खायला ! आणखी कांहीं नको का ? सफा करायचा विचार आहे दोस्ताला ! आज नुसतं तीर्थ—प्रसाद पुढें !

**भाअिंदर :** आजच्यासारखा आनंद झाला नाहीं कधीं आपल्याला—

**भांडूप :** आपल्या घरांतलं माणूस–म्हणजे आपला सख्खा भाऊच म्हणा ना—पास व्हावा तसं आम्हांला वाटतं !

**मुलुंद :** नशीब लागतं बाबा, याला ! नाहीं तर आम्हीं ! बारा वर्षे घासतों आहोंत–खर्डे !

**अंबरनाथ :** अन् आम्हीं ठोकतों आहोंत–टाअिपरायटर !

**भाअिंदर :** नशिबाचा प्रश्न नाहीं हा ! उद्योग, प्रयत्न आणि अभ्यास यांचें हें फळ आहे. "असाध्य तें साध्य करितां सायास । कारण अभ्यास तुका म्हणे !"

**गोलपिठा :** अरे, तमे तो वार्ताच करते नाय, कल्याण !

**भांडूप :** विचार चाललेला दिसतो कसला तरी डोक्यांत !

**कल्याण :** मला जायचंय अेकाकडे–जरूरीचं काम आहे. त्याचा सारखा विचार चालला आहे ! अेक्स्क्यूज मी–आलोंच मी अितक्यांत !

[ आंत जातो.

**मुलुंद :** कांहीं तरी भानगडींत दिसते आहे स्वारी ! ( हलक्या आवाजांत ) कुठं जायचंय याला अेकाकडे ?

**झावबा :** अेकाकडे का अेकीकडे ?

**अंबरनाथ :** अरे, अेकीकडे काय–अनेकीकडे ! अेवढ्या आनंदाचा दिवस ! हा घरीं झोंपून काढणार होय ! आज आख्खी मुंबअी जागवणार स्वारी !

**भांडूप :** कल्याण म्हणजे राजा आहे मुंबअीचा ! अितक्या भानगडी करतो, पण ह्या कानाचा त्या कानाला पत्ता नाहीं ! नाहीं तर हा मुलुंद–अेक भानगड केली तर सारी चाळ बोंबलत अुठली !

**मुलुंद :** अरे, आमची कशाला तुलना करताय कल्याणशीं ! कुठं डेक्कन क्वीन

---

डेक्कन क्वीन=पुणें आणि मुंबअीमधें धांवणारी एक राजविलासी व द्रुतगतीची आगगाडी; बोरिवली लोकल=चर्चगेट ते बोरिवलीपर्यंत दर स्टेशन थांबत जाणारी बी. बी. सी. आय्. ची शहरांतर्गत आगगाडी.

अन् कुठं बोरिवली लोकल ! त्यांचं ठीक आहे. त्यांच्या प्रेमाची गाडी आधींमधीं थोडीच थांबते आहे ! मुंबअी ते अेकदम कर्जत ! मग कशाला लागतो आहे पत्ता ! आमची गाडी म्हणजे ' स्टॉपिंग ॲट ऑल स्टेशन्स ' ! दिसलं स्टेशन कीं थांबलीच आमची गाडी ! म्हणून बोंब होते, दुसरं काय ?

**झावबा :** कांहीं म्हणा बुवा ! कल्याणची जागा तर फक्कड आहे ! काय समुद्रावरून वारा येतो आहे मजेदार ! आमच्या ठाकुरद्वारला वाराच नाहीं मुळीं ! रोज ऑफिसांतून घरीं परत जातांना घटकाभर मुक्काम करायला बरं ठिकाण आहे !

**भांडूप :** शंभर रुपये भाडें आहे मेहेरबान !

**मुलुंद :** काय रे, पण मी म्हणतों, याचें अेवढें चालतें कसें ? अडीचशें रुपये याला पगार ! निम्मे तर भाडेंच गेलें. हें फर्निचर बघा–कपडे बघा त्याचे—

**गोलपिठा :** रोज अेक अेक सूट !

**झावबा :** टॅक्सीशिवाय ऑफिसांत येत नाहीं ! आमच्याजवळ ट्रॅमला आणेली नसते !

**अंबरनाथ :** शनिवार रविवार ग्रीन्स अन् ताजमहाल !

**मुलुंद :** आणि अितकंही करून हा म्हणतो त्याप्रमाणें गांवांत अनेक भानगडी ! कुठं लेकाच्याची धनरेषा उमटली आहे कोणास ठाऊक ? कसं या लोकांचं चालतं–आपलं कांहीं डोकं चालत नाहीं !

**भांडूप :** ( गंभीर चेहरा करून ) कसं चालतं ! फार गहन प्रश्न आहे हा !

**सँटाक्रूझ :** आय् टेल यू मॅन ! ही गॉट फॉर्टी थाव्जंड अिन अवर गोवा लॉटरी !

**मुलुंद :** अरे चल, असे गोवा लॉटरींत पैसे मिळताहेत !

**झावबा :** मी दहा वर्षें नियमानें गोवा लॉटरीचें तिकीट घेतों आहें ! अेकदां आलें होतें आपल्याला तीन रुपयांचें बक्षीस !

**भांडूप :** जाअूं द्या ना, आपल्याला काय करायचं दुसऱ्याच्या भानगडींत शिरून ! लॉटरींत पैसे मिळवतो–का रेसमध्यें मिळवतो–का चोऱ्या करतो–का कुठल्या बायांकडून आणतो–करायचंय काय आपल्याला या अुठाठेवी करून !

**मुलुंद :** अितकीं वर्षें प्रामाणिकपणानें तुम्ही-आम्ही ऑफिसांत हमाली करतों आहोंत–पण या महिन्याचा त्या महिन्याला पत्ता लागत नाहीं ! तुम्हां आम्हांला काय चैन करावीशी वाटत नाहीं–पण कोणाच्या बापाकडून पैसे आणायचे ?

**भांडूप :** तेंच तर मी म्हणतों ! तुम्हां–आम्हांला कळत का नाहीं याचं कसं चालतं तें ! पण मी म्हणतों आपण बोला कशाला ? तुम्ही लोक बोलून सारी घाण करतां ?

**भाअिंद्र :** लाख बोललांत ! " तुका म्हणे गप्प रहावें । जें जें होईल तें तें पहावें ! "

[ बन्सी व अेक मुसलमान नोकर पिण्याचें सारें बारदान घेऊन येतात.

**भांडूप :** अरे, हा कल्याण करतोय काय आंत ?

**अंबरनाथ :** मी आणतों बोलावून !

[ आंत जातो. भांडूप सगळयांचे ग्लास शिस्तीनें भरतो.

**अंबरनाथ :** ( आंतून येतां येतां ) पोषाख बदलणें चाललें आहे सॉलिसिटर-साहेबांचें. फारच मोठ्या मोहिमेवर निघण्याची तयारी दिसते आहे आज !

**झावबा :** आपल्याला आतां नाहीं दम ! आपण सुरू करणार !

**मुळुंद :** कल्याणचें ठीक आहे ! ते काय रोज पिणारे आहेत ! आम्हांला कधीं वर्षांतून अेकादे वेळीं मिळायचें !

[ सारे पितात.

**भाअिंद्र :** ( पिण्यापूर्वीं डोळे झांकून ) जय समर्थ माअुली ! तुझी कृपा बरं !

**अंबरनाथ :** ( गोलपिठा अुम्यानेंच सारा ग्लास पिअून संपवितो. त्याला ) अे खडा पार्शी, खालीं बसून पी कीं लेका !

**मुळुंद :** ( दीर्घ निःश्वास टाकून ) आतां बरें वाटलें. सकाळपासून अशी घाण भरली होती डोक्यांत ! काय झालं, आज दहा वाजतां मी लोकलनें येत होतों– आणि दादरला अेक मासेवाली शिरली न् काय आमच्या डब्यांत, त्या मासळीच्या टोपल्या घेअून ! चर्चगेटला येअीपर्यंत नाक मुठींत धरून बसलों होतों. असं डोकं अुठून गेलें ! समाधानाची जागा अेवढीच होती कीं मासेवाली दिसायला मात्र झकास होती.

**भाअिंद्र :** प्रकृतीला हें बरें असतें म्हणतात !

**भांडूप :** अुत्तम ! हा झावबा सामंत पहा ! रोज नियमानें अेक बीअरची बाटली घेतो–अर्थात् दुसऱ्याच्या पैशानें–तेव्हां याची प्रकृती ही अशी !

**भाअिंद्र :** हें तिसरें लग्न केल्यापासून आपली प्रकृती पार ढांसळली !

**अंबरनाथ :** अुघडच आहे.

[ सारे हंसतात.

**भाअिंदर :** छेः, छेः, तसं कांहीं नाहीं अं ! प्रकृति विघडण्याचं कारण म्हणजे आमची तिसरी बायको भयंकर घोरणारी आहे ! सारी रात्र घोरत असते. गेले तीन महिने डोळ्याला डोळा नाहीं माझा ! दुपारीं कधीं झोंप काढावी म्हटलें तर शेजारीं गिरणीची खडाड-खड ! अेकूण काय, दिवसा गिरणी न् रात्री बायको ! नको झाला आहे जीव !

**भांडूप :** (वर्तमानपत्र वाचतां वाचतां) कमाल आहे या साहित्यिकांची ! हें पाहिलेंत ! (वाचतो.) "एका सुप्रसिद्ध साहित्यिकाचा एका सिनेमा नटीशीं लौकरच विवाह होणार आहे !" आणि याची पाहिली बायको जिवंत आहे बरं !

**मुलुंद :** (पितां पितां) तुम्ही कांहीं म्हणा भांडूप, या साहित्यिक लोकांना मॉरल कॅरेक्टर नाहीं कांहीं !

**अंबरनाथ :** (भांडूपच्या खांद्यावरून वर्तमापत्र वाचतां वाचतां) अरे, देवधरनें सेंचरी काढली कीं !

**भाअिंदर :** देवधर म्हणजे आपला पुण्याचाच ना ! काढणारच तो सेंचरी ! देवधर म्हणजे काय गोष्ट आहे महाराज ! कशीं अितकीं कामें करतो ! क्रिकेटही खेळतो आणि सेवासदनही चालवतो.

[ सारे हंसतात.

**भांडूप :** काय भाअिंदर, चढली कीं काय ?

**मुलुंद :** हा अकलेचा खंदक पहिल्यापासून असा ! काय थोडसं गाणं येत असेल तेवढं ! बाकीचें ज्ञान म्हणजे आवळ्याएवढें पूज्य !

**अंबरनाथ :** बरी आठवण केली ! भाअिंदर, एक चीज होअूं द्या बुवा !

**भांडूप :** अे, माफ कर ! अजून आपण प्यालों नाहीं पुरतें ! त्याच्या आधींच ओकारी नको ! गिरणीच्या भोंग्यासारखा आवाज, आणि म्हणे चीज होअूं द्या !

**भाअिंदर :** गाणें कळायला अकल लागते ! मृच्छकटीक नाटकांत चारुदत्ताचें काम केलें आहे म्हटलें एकदां ! तें काय अुगीच ?

**भांडूप :** वा तोंड बघा, म्हणे चारुदत्ताचें काम केलें आहे. चारुदत्ताचें नाहीं पण शेवटच्या अंकांत चारुदत्ताला सुळीं देणाऱ्या मांगाचें मात्र केलें असशील !

**भाअिंदर :** हातच्या कांकणाला आरसा कशाला ! गाअून दाखवतों म्हणजे समजेल !

**अंबरनाथ :** भले बहाद्दर ! करा सुरू ! कोणती चीज म्हणतो ?

**भाअिंदर :** या-या मांडूपांना आमच्या बुद्धिमत्तेचा नमुना दाखवतों. आजकाल 'वंदेमातरम्' या पदाला निरनिराळे राग लावून दाखविण्याच्या शर्यती सुरू झाल्या आहेत गवअी लोकांत ! पण 'गॉड सेव्ह दी किंग' या इंग्रजी पदाला आपल्या-कडचा राग लावण्याचा कोणी प्रयत्न केला आहे का ! मी तुम्हांला भैरवी लावून दाखवितों !

**सारे :** ब्रव्हो भाअिंदर !

[ भाअिंदर "गॉड सेव्ह द किंग" हें गीत भैरवींत म्हणून दाखवतो. गाणें संपल्यावर सारे त्याची पाठ थोपटतात.

**मांडूप :** अरे, हा कल्याण आतां येणार कधीं बाहेर? करतोय काय आंत इतका वेळ !

**गोलपिठा :** त्येला हात धरूनशानींच आणतों.

[ एकदम उठतो व कांता ज्या खोलींत आहे त्या खोलींत शिरतो.

**अंबरनाथ :** अे, अरे तिकडे कुठें शिरतोस ! शुद्धीवर आहेस का ?

[ पण हें म्हणायच्या आधींच गोलपिठा आंत जातो आणि लगेच आश्चर्य-चकित होअून बाहेर येतो.

**गोलपिठा :** अरे बापरे ! या रूममंदी तो अेक बाअीलोक आहे झोपलेली !

[ सारे अेकदम त्याच्या तोंडाकडे पहातात.

**मुकुंद :** अरे चल, कल्याणच्या घरांत कुठली बाअी आली ! त्याचं लग्न तरी झालं आहे का ? चढली आहे तुला झालं !

**गोलपिठा :** मैं पोत्ते पायली ! तूं ये बघूनशान !

[ सारे अेकदम जाऊं लागतात, तोंच अंबरनाथ त्यांना बसवतो.

**अंबरनाथ :** अे, खामोष ! गडबड करूं नका ! मी बघून येतों. (हलक्या पावलांनीं खोलीकडे जातो व दार उघडून बघतो व अेकदम मिस्कील चेहरा करून घाअीघाअीनें परत येतो.) टाळी द्या ! मजा आहे न् काय ! आतां कळलं सारं बिंग !

**सारे :** अरे पण, काय-कोण !

**अंबरनाथ :** कोण म्हणून काय विचारताय ? (हलक्या आवाजांत) अरे, आपल्या भाअीलाल शेटजींची भाची !

**सारे :** काय म्हणतां ! कमाल आहे बुवा !

**मुकुंद :** दुसरी असेल कोणी तरी !

**अंबरनाथ :** छट्, नांव नको, पोरीच्या बाबतींत असली चूक आपल्या हातून व्हायची नाहीं ! सान्या गांवची छटेल आहे ती पोरगी ! दिवसभर गांवांतून भटकत असते. आपण केला होता अेकदां प्रयत्न—नाहीं साघलं आपल्याला !

**भांडूप :** अे, तुम्हीं गडबड करूं नका ! तो येअील अितक्यांत ! आंत स्वारी मुक्काम करून बसली तेव्हांच सारा प्रकार माझ्या घ्यानांत आला ! मी याच्या सान्या भानगडी जाणून आहें ! पण आपण बोलत नाहीं. आतां कळलं कसं चालतं तें ? हीं तुमचीं—आमचीं कामं नव्हेत !

**भाअिंद्र :** " तेथें पाहिजे जातीचें । येन्या गबाळाचें काम नोहे !"

[ सारे हंसतात. अितक्यांत बाहेर जाण्याचा रात्रीचा पोषाख घालून कल्याण बाहेर येतो. सारे 'या सॉलिसिटरसाहेब !' म्हणून ओरडतात.

**भांडूप :** कसा दिसतो आहे सॉलिसिटर ! अशी फिगर पाहिजे ! नाहीं तर आपले पेस्तनजी आणि भाअीलाल शेटजी ! नुसते पायधुणीवरचे दिसतात लेकाचे !

**कल्याण :** माफ करा अं—जरा वेळ लागला !

**मुकुंद :** हो बरोबर आहे, वेळ लागण्यासारखंच काम असल्यावर कां नाहीं वेळ लागणार !

**कल्याण :** हे कपडे घालायचं म्हणजे भारी त्रास असतो. बरं, मी जातों. अेक्स्क्यूज अं ! तुमचं अर्ध्या तासांत आटपेल असं मला वाटतं ! नाहीं का ! मला परत यायला उशीर होईल ! तुम्ही माझी वाट पाहूं नका ! येअूं मी—( अेकदम आठवण झाल्यासारखें करून, बन्सी, ( बन्सी येतो. ) अरे. तें कुलूप घेअून ये ! ( बन्सी जातो. ) आय् ॲम ग्लॅड, यू आर ऑल अेंजॉअिंग ! ( बन्सी कुलूप घेअून येतो व कांताच्या खोलीच्या दाराला तो तें लावतो ) कामाचे कागदपत्र आहेत तेव्हां आपलं सावध असावं ! बरं आहे, गुड नाअिट !

[ जातो. तो गेल्यावर "कामाचे कागदपत्र !" असें म्हणून सारे मोठमोठ्यानें हंसतात.

**झावबा :** चांगल्या कामाचे कागदपत्र आहेत !

**मुकुंद :** काय बदमाष आहे ! आमच्या देखत कुलूप लावून गेला कीं ! जसा कांहीं हक्काचा माल ! कां आम्ही चोरून नेअूं असं याला वाटलं !

**अंबरनाथ :** काय पोषाख केला होता ! अरे, असल्या पोषाखानें कां नाहीं मुडदे पडणार पोरींचे !

**मुळुंद :** भाअीलाल शेटला हें कळलें तर!
**भांडूप :** अरे तोही यांतलाच! त्यांनीं देखील पाठवली असेल हिला! मोठ्यांच्या भानगडी सगळ्या या अशा! आपल्याला काय करायचंय म्हणा! अितका चांगला माणूस हा! वाया गेला अगदीं! तुम्हांला ठाअूक आहे हा कशाचा परिणाम? दारू-ही बरं!
**भाअिंदर :** अरे-अरे-दारूमुळें मनुष्य अितका बिघडतो अं! दारू पिणं वाअीट म्हणतात तें कांहीं खोटं नाहीं!
[ पितो.
**भांडूप :** दारूमुळें मनुष्य कुणीकडे वाहवत जाअील, पत्ता लागायचा नाहीं! मनुष्य प्यायला लागला कीं त्याची नीति बिघडली म्हणून समजा!
**झावबा :** कसें बोललांत! आणि माणसाची नीति अेकदां बिघडली कीं खलास!
**भाअिंदर :** छेः छेः, आपण दारू पीत नाहीं, फार अुत्तम आहे!
**मुळुंद :** म्हणूनच दारूबंदीला आपला सर्वस्वी पाठिंबा आहे. (पितो.) मला कल्पना नव्हती, कल्याण अितका पीत असेल!
**भांडूप :** अरे, पट्टीचा पिणारा आहे तो! तुम्हीं-आम्हीं अेक ग्लास घेतला कीं लटपटायला लागतों. आतांच पहा. कसा गेला ताठ चालत! वाटेल कोणाला हा प्यालाय म्हणून? पण, मी खात्रीनें सांगतों, आज दुपारपासून हा सारखा पीत असला पाहिजे!
**मुळुंद :** कांहीं म्हणा, भाग्यशाली आहे लेकाचा! तुमच्या-आमच्यावर अेक पोरगी फिदा होअील तर शपथ! आणि हा बघा! कांहीं कांहीं लोकांना ही अेक नॅकच साधून गेली आहे!
**अंबरनाथ :** त्याला दमड्या खर्च कराव्या लागतात मेहेरबान! फुकटच्चीं कामें नाहींत हीं! टॅक्सी पाहिजे, हॉटेल पाहिजे, सिनेमाला जायला पाहिजे, प्रेझेंटस द्यायला पाहिजेत; पाण्यासारखा पैसा खर्च करावा लागतो-तेव्हां पोरी मिळतात. तुमची आहे ताकद! तुम्ही अेकादी पोरगी टॅक्सीमधून जन्मांत कधीं घेअून गेलांत, तर पोरीच्या तोंडाकडे बघण्याअैवजीं, त्या मीटरकडे पहात बसाल! तुम्हीं आपली चाळींतल्या चाळींत नळावर गंमत करावी.
**मुळुंद :** नळावरच्या गंमती तुला काय कळायच्या आहेत बरुच्याला! चाळींतला नळ म्हणजे आमच्यासारख्या गरीबांच्या शृंगाराची पाणपोअी आहे. आपण रोज सकाळीं दोन तास नळावर मुक्काम करून असतों.

**भांड्रप :** आणि नुसत्या पैशावरच पोरी मिळतात असेंही नाहीं ! त्याला निराळेंच कांहीं तरी लागतें ! पोरी कांहीं प्लॅटफार्मच्या तिकिटासारख्या नाहींत ! कीं घातली आणेली की आली एक पोरगी बाहेर !

**अंबरनाथ :** तुम्हांला नाहीं कळायचं तें ! पैशाची सारी जादू आहे ही ! या मुंबअींत असे रंगेल नवाब आहेत एकेक कीं दर चार महिन्याला मुलगी आणि मोटार कोरी करकरीत ! या महिन्याचें मॉडेल पुढल्या महिन्याला नाहीं ! नाहीं तर तुम्ही आम्ही ! दहा वर्षं झालीं तरी आपलें तेंच मॉडेल ! भाअिंदर, कुलाब्याला जात जा रोज संध्याकाळीं, म्हणजे तुम्हांला या गंमती पहायला तरी सांपडतील !

**भाअिंदर :** कांहीं नको आम्हांला तुमचें तें कुलाबा अन् जुहू ! मजल्याच्या ट्रॅम गाडीसारखी मौज नाहीं ! अेक आणा देअून आपलं वर बसावं ! म्हणजें अशा पहायला सांपडतात दुसऱ्याच्या घरांतल्या गंमती–अगदीं फुकट !

**मुकुंद :** पण मी म्हणतों, हा या पोरीला कोंडून गेला कुठं ?

**भांड्रप :** तें तुम्हांला नाहीं कळायचं ! हें शिकारीचें शास्त्र आहे. वाघ अेक शेळी अर्धवट खाअून गुहेंत ठेवतो व बाहेर दुसऱ्या शिकारीच्या शोधासाठीं भटकत असतो.

**झावबा :** चला आपलीही शिकार साधली ! आतां अिथं बसण्यांत कांहीं अर्थ नाहीं ! रोज एक बीअरची बाटली मिळविण्यासाठीं या सामंतभाअीला अेक बकरा कापावा लागतो.

**भांड्रप :** अे, पण तुम्हां मंडळींना माझी विनंति आहे. आतां हा प्रकार आपण जो अिथं पाहिला त्याची वाच्यता होतां कामा नये कुठं ! नाहीं तर भकत सुटाल ज्याच्या त्याच्यापाशीं ! तुम्हां लोकांना दुसऱ्याची निंदा व बदनामी करण्याची भारी वाईट खोड आहे. कल्याण कसाही असला तरी तो आपला दोस्त आहे. दोस्ताची अब्रू राखणें आपलें कर्तव्य आहे.

**मुकुंद :** हें पहा, आमच्यापेक्षां तुमच्याच तोंडाला जरा जपा. नाहीं तर तें खोलीचं कुलूप काढून तुमच्या तोंडाला लावा.

**भांड्रप :** अरे लेका, लाज नाहीं वाटत बोलायला ! हा भगवंतराव भांड्रप म्हणजे काय सामान्य माणूस आहे ! अक्षर नाहीं निघायचं तोंडांतून, अक्षर ! कल्याणचं तर दूरच राहूं दे–पण तुम्हा लोकांच्या अितक्या भानगडी मला माहीत आहेत–पण आपण कधीं बोललोंय का कुणाला ? हा गोलपिठा, याला विदाअुट तिकीट प्रवास केल्याबद्दल पांचदां दंड झाला आहे—

**वाकीचे :** ( आश्चर्यानें ) अं !

**भांडूप :** पण आपण त्याबद्दल अक्षर काढलं आहे का ! हा मुळुंद, हा विधुर आहे. मी याच्या किती दिवस मागें लागलों आहे कीं बाबा लग्न कर ! पण नाहीं अैकलं. गेला एक दिवशीं शेण खायला आणि आला टणाणा करीत ! शेवटीं मी घेअून याला डॉक्टरकडे नेलं–अिंजेक्शनं दिलीं आणि बरा केला. पण अितकं करून याबद्दल चुकून अवाक्षर–नांव नको !

**वाकीचे :** भले मुळुंद !

**भांडूप :** हा झावबा–अेवढा म्हातारा झाला आहे–गेल्या वर्षी चौपाटीवर फिरायला गेला होता. समुद्राकडे तोंड करून यांनीं एक लहानशी शंका प्रदर्शित केली–याला दोन रुपये दंड झाला !

**वाकीचे :** शाबास झावबा !

**भांडूप :** पण आपण, अेक चुकून अक्षर बोललों नाहीं याबद्दल. हा अंबरनाथ, याचं काय सांगायचं ! दुसऱ्यासारखं बेमालूम अक्षर काढण्यांत असा पटाअीत आहे–सांगू का तें चेकचें—

**वाकीचे :** काय चेकची भानगड आहे ?

**अंबरनाथ :** पाया पडतों माझे आअी—

**भांडूप :** घाबरूं नकोस तूं–आपल्या तोंडून कधीं शब्द निघायचा नाहीं. पण मी सांगून ठेवतों, कीं हें कारटं एक वेळ तुरुंगांत जाणार !

**भाअिंदर :** भांडूप, नमस्कार आहे तुम्हांला ! अरे, काय माहिती–काय माहिती–

**मुळुंद :** आणि अितकं असून–तोंडांतून अवाक्षर नाहीं ! जो आपल्या मित्राची निंदा करतो तो काय माणूस आहे—

**भाअिंदर :** "तुका म्हणे निंदक नरा । मोजुनी माराव्या पैजारा !" चला, हें कांहीं संपायचें नाहीं, घरींच घेअून जावें !

[ खिशांत बाटली घालतो. सारे उठतात व "चला, अुशीर झाला", "खूप मजा झाली आज !", "कल्याण म्हणजे लाखांतला माणूस आहे !" अशी बडबड करीत बाहेर जाअूं लागतात. अंबरनाथ हलकेंच मागें रहातो व कुलूप घातलेल्या खोलीच्या दाराच्या फटींतून आंत पाहूं लागतो. अितक्यांत भांडूप मागें परतून येतो व अंबरनाथची मानगूट पकडतो.

**भांडूप :** मेल्याशिवाय खोड जायची नाहीं तुझी ! चल हो पुढं ! कांहीं सभ्यपणा आहे कीं नाहीं !

[ अंबरनाथ जातो. तो गेला आहे कीं नाहीं हें दरवाजापर्यंत जाऊन पाहिल्यानंतर हलक्याच पावलांनीं भांडूप परत येतो व दाराच्या फटींतून पाहूं लागतो. कांहीं वेळानें त्याच्या मनांत अेक विचार येतो व तो दाराचें कुलूप अुघडण्याचा प्रयत्न करतो. अितक्यांत रा. सा. अंबादास प्रवेश करतात. रावसाहेबांची अुमर पन्नासपंचावन्न असून त्यांचा पोषाख, चर्या, वगैरे सर्व पहातां ते मुंबअीचे तर नाहींच नाहींत—पण मुंबअीला प्रथमच आले असावेत असें वाटतें. आंत आल्यानंतर ते अिकडे तिकडे बावरल्यासारखे पहातात व क्षणभर काय करावें हें त्यांना कळत नाहीं. खिशांतील डायरी काढून त्यांतलें कांहीं तरी वाचतात व फिरून चहूंकडे निरखून पहातात व मग मनाचा कांहीं तरी निश्चय करतात.

**अंबादास :** कल्याण आहेत का आंत ?

[ भांडूप मोठ्यानें दचकून मागल्या मागें कोलमडतो. तरी पण तोल सांवरुन चटकन् अुभा रहातो व चेहेऱ्यावरील भीति लपविण्याचा प्रयत्न करतो.

**भांडूप :** कोण—काय पाहिजे तुम्हांला ?

**अंबादास :** कल्याण अिथंच रहातात काय म्हटलं !

**भांडूप :** हो—हो—कां ?

**अंबादास :** शेवटीं सांपडला अेकदाचा पत्ता. छे, छे, या मुंबअींत अेकाद्याचा पत्ता शोधून काढायचा म्हणजे काय खटाटोप आहे ! कोल्हापूराहून मी आलों. आतां पांच वाजतां बोरीबंदरावर अुतरलों. तेव्हांपासून तीन तास झाले हा असा भिरीभिरी हिंडतों आहें. या गल्लींत नाहीं—त्या गल्लींत जा ! खालीं अुतर, पुन्हां वर चढ. अेकेक अिमारती पांच पांच मजली ! खालीं—वर करतां करतां आम्हीच वर जायचे ! (अुपरण्यानें वारा घेत अेका खुर्चीवर बसतो.) तुम्हां शहरांतल्या लोकांना जिने चढायची संवय आहे, तशी आम्हां खेडेगांवांतल्या लोकांना थोडीच आहे ? ज्या बिऱ्हाडीं जावं तिथं आपलं दार बंद. प्रत्येक ठिकाणीं घंटा वाजवायची अन् शंख करायचा ! या मुंबअीच्या लोकांना दारं बंद करुन बसण्याची वाअीट खोड आहे. काय करतात आंत लेकाचे कोणास ठाअूक !

**भांडूप :** हें पहा, मला तुमच्याशीं बोलायला वेळ नाहीं—जातों मी.

**अंबादास :** भलें शाबास ! म्हणजे मीं मुद्दाम कोल्हापुराहून अिथं आलों. आणि तुम्हांला म्हणे बोलायलाही वेळ नाहीं ! बसा खालीं ! (त्याला ओढून खालीं

बसवतो.) तुम्हीं मला ओळखणार नाहींत. पण आमच्या त्या भागांत आमचं नांव फार प्रसिद्ध आहे. माझं नांव रावसाहेब अंबादास. म्हणजे मी कांहीं रावसाहेब नाहीं. आमच्या संस्थानांत वाटेल त्याला रावसाहेब म्हणतात. आमचं घराणं म्हणजे थोरल्या शाहू महाराजांच्या वेळीं—

**भांडूप :** हें पहा, आपल्या घराण्याचा सारा अितिहास अैकण्यासारख्या स्थितींत मी हल्लीं नाहीं. तुमचं काम काय आहे कल्याणशीं ?

**अंबादास :** म्हणजे, तुम्हीं नाहींत का कल्याण ? हात्तिच्या, मग सगळंच मुसळ केरांत ! कमाल आहे या मुंबअींतल्या लोकांची. ज्याला भेटायला जावं तो आपला नेमका बाहेर ! मघाशीं आलों तसा प्रथम त्या बोर्डिंगमध्यें गेलों—म्हणजे आमची पुतणी असते अिथं कॉलेजांत—ती त्या आपल्या या बोर्डिंगमध्यें रहाते—विचारलं कुठें गेली, तर म्हणे बाहेर ! दीड घंटे बसलों तिथं, तरी पत्ता नाहीं तिचा ! शेवटीं कल्याणचा शोध करावा म्हणून निघालों. घंटाभर धडपडून शेवटीं अिथं आलों तर हाही आपला बाहेरच ! ती बाहेर, हा बाहेर, सगळेच बाहेर ! छे, मुंबअीच्या लोकांना अेकंदरींत बाहेरचा नादच फार ! आतां हा येणार तरी कधीं परत ?

**भांडूप :** तें कांहीं सांगतां येत नाहीं ! फार रात्र होअील त्यांना यायला. कदाचित अेकादे वेळीं यायचेही नाहींत ते.

**अंबादास :** म्हणजे ! काय म्हणतां काय ! रात्रीं घरीं परत यायचे नाहींत हे ? पण रात्रभर बाहेर राहून करणार काय हे ?

**भांडूप :** तें कसं सांगतां येअील ! ही मुंबअी आहे ! अिथं रात्रभर बाहेर राहून पुष्कळ गोष्टी करतां येण्यासारख्या आहेत. पण मला आधीं हें सांगा—कल्याणशीं काम तरी काय आहे तुमचं ?

**अंबादास :** काम तर फार महत्त्वाचं आहे, म्हणून तर अिथं धडपडत आलों. ही आमची पुतणी म्हणून तुम्हांला सांगितली ना—तिनं या कल्याणशींच आपण लग्न करणार असा नाद घेतला आहे—

**भांडूप :** काय म्हणतां ?

**अंबादास :** मग काय तर ! चावट कारटी ! कशी या दोघांची ओळख झाली—त्याची आधीं झालीं का हिचीं आधीं झाली—कुठं दोघेजण भेटत होते—काय बोलत होते अन् काय करत होते, राम जाणें !

**भांडूप :** मला कल्पनाच नाहीं अगदीं !

**अंबादास** : मला तरी कुठं होती ? परवां हिनं धडधडीत पत्रांतच लिहून कळवलं तेव्हां मला कळलं ! बेधडक लिहिते आपली–साष्टांग नमस्कार विनंती विशेष–माझं लग्न करण्याचा विचार आहे ! आतां काय म्हणावं या पोरीला ! शहाणपणा वाढावा म्हणून मुद्दाम शहरांत शिकायला पाठविलं ! तर अिथं हीं शिंगं फुटलीं ! तेव्हां अुठलों घरांतून आणि सरळ निघून अिथं आलों. म्हटलं दही फारच घट्ट व्हायच्या आधीं आपण घुसळून पातळ केलेलं बरं.

**भांडूप** : फार अुत्तम केलंत आपण !

**अंबादास** : कसं बोललांत ! घ्या–जरदा घ्या ! आमच्या सातारकडचा आहे. नाहीं घेत ? बरं. खरं म्हणाल तर कल्याण हें नांव देखील मीं अैकलं नाहीं. तो काळा आहे का गोरा आहे—

**भांडूप** : नाहीं–तसा तो गोरा आहे—

**अंबादास** : ते नाहीं हो म्हणत मी ! पण आम्ही कोल्हापूरचे–तो अिथला मुंबअीचा–आम्हांला त्याची काय माहिती असणार ? काल सकाळीं पुण्याला आलों–तिथं थोडीशी चौकशी केली–तर लोक भलभलतंच सांगू लागले या माणसाविषयीं !

**भांडूप** : पुण्याचे लोक भारी निंदाखोर ! त्यांच्यावर काय तुम्ही विश्वास ठेवतां ? प्रत्यक्ष पाहिल्याशिवाय आपण कोणत्याही गोष्टीवर विश्वास ठेवूं नये !

**अंबादास** : भले, कसं बोललांत ! म्हणून तर मी अिथं आलों. म्हटलं सरळ जावं अन् विचारावं ! अेकानं मला सांगितलं कीं म्हणे यांना पिण्याचा नाद आहे–तरं अेक म्हणाला कीं हे वाटेल तें खातात–आणि आतां तुम्हीं सांगितलंत कीं रात्रभर परतही येणार नाहींत हे घरीं !

**भांडूप** : छेः छे, तें मी बोललों तें अगदीं विसरून जा. कोणत्या कामाकरितां तुम्हीं आलां हें मला ठाऊक असतं तर मी तसं बोललों नसतों. हें पहा, कल्याण माझे मित्र आहेत–त्यांच्या सगळ्या भानगडी आम्हांला माहीत आहेत–त्या सगळ्या लिहून काढल्या तर महाभारताअेवढा ग्रंथ होअील ग्रंथ ! पण आपण अवाक्षर काढीत नाहीं कधीं कोणाला त्याच्याबद्दल ! आपल्याला करायचंय काय–ही मुंबअी आहे ! अिथं कोण काय करतो अन् कोण काय करीत नाहीं या खोलांत फारसं शिरूं नये.

**अंबादास** : म्हणजे, काय म्हणतां काय तुम्हीं ?

[ मुकुंद येतो.

**मुकुंद :** भले शाब्बास, म्हणजे खालीं आम्ही वाट पहात अुभे आहोंत, आणि तूं अजून अिथंच ! म्हटलं आणखी पीतबोत—

**भांडूप :** ( अेकदम खोकतो. ) आलों-चल. रावसाहेब, अुद्यां मी तुम्हांला भेटेन- कुठं अुतरलां आहांत तुम्हीं ?

**अंबादास :** सरदारगृहांत-आमचा तो विसुभाअू साळवेकर आहे ना—

**भांडूप :** मग मी अुद्यां नक्की येतों सकाळीं आठ वाजतां-नमस्कार-मघाशीं मी बोललों तें मनावर घेअूं नका अं ?

[ दोघे जातात.

**अंबादास :** अहो-अहो-गेले वाटतं ! सगळंच मुसळ केरांत ! अितक्या वेळ या माणसाशीं बोललों आणि त्याचं नांवच विचारायचं विसरलों. जाअूं द्या; येअील अुद्यां. महाभारताअेवढा ग्रंथ होईल काय ! म्हणजे आटोपलाच हा ग्रंथ ! पुण्याला जें अैकलं तें कांहीं खोटें नाहीं तर ! ( आजूबाजूला पाहातो, तों टेबलावर बाटल्या व कांचेचे प्याले पडलेले दिसतात. ) या कसल्या बाटल्या ? ( जवळ जाऊन वास घेतो व घाण आल्यासारखा चेहरा करतो. ) दारूच ही ! छेः छेः, काय घाण सुटली आहे ! किती बाटल्या या ! घर आहे का गुत्ता आहे ! प्रत्यक्षच पुरावा मिळाला—आणि असल्या या माणसाशीं ही कार्टी लग्न करायला निघाली ! आतां अिथं बसण्यांत काय अर्थ आहे ?

[ जाऊं लागतो. तोंच बाजूच्या खोलीचें कुलुपबंद दार आतून खडखडूं लागतें. व " कल्याण, कल्याण, दार उघतां कीं नाहीं ? " असे कांताचे शब्द ऐकूं येतात.

**अंबादास :** ही काय भानगड आहे ? बाअीचा आवाज दिसतोय हा !

[ दाराजवळ जातो.

**कांता :** ( आंतून ) दार उघडतां कीं नाहीं ?

**अंबादास :** कोण आहे आंत ?

**कांता :** तुमची आअी !

**अंबादास :** ( दचकून ) माझी आअी ! छट् ! माझी आअी वारल्याला वीस वर्षे झालीं !

**कांता :** तुम्हीं आधीं दार उघडा पाहूं—

**अंबादास :** अहो, पण बाहेरून कुलुप आहे ना ! थांबा जरा, माझी किल्ली चालते कीं नाहीं तें पहातों.

[ जानव्याला बांधलेल्या किल्ल्यांचा जुडगा काढतो व त्यांतल्या किल्ल्या चालवून बघतो; त्यांतील एक किल्ली लागते. कुलूप उघडून दार खोलतो, त्याबरोबर कांता बाहेर येते.

कांता : कोण तुम्ही ?

अंबादास : तुम्ही कोण ?

कांता : कल्याण कुठं आहेत ?

अंबादास : मला काय ठाऊक ? तुम्हांला कोणीं कोंडून ठेवलं ?

कांता : कल्याणनं !

अंबादास : पण तुम्हांला खोलींत कोंडून ठेवायचा त्याचा काय संबंध ?

कांता : आमचा काय संबंध आहे तें तुम्हांला काय सांगायचंय !

अंबादास : तो तुम्ही नाहीं सांगितलांत तरी आतां स्पष्टच आहे कीं ! मला नव्हतं वाटलं कल्याणचं लग्न झालं आहे म्हणून !

कांता : म्हणजे, तुम्ही काय मला त्यांची बायको समजलांत कीं काय ?
[ हंसते.

अंबादास : नाहीं का ? मग तुम्ही त्यांच्या आहांत तरी कोण ?

कांता : मी त्यांची—

अंबादास : बस्, बस्, नका सांगूं ! आतां आलं ध्यानांत ! तुम्ही त्यांच्या ह्या–म्हणजे आपल्या ह्या–आहांत ! मुंबअीला या गोष्टी राजरोसपणें चालतात असें अकत होतो तें खरंच म्हणायचं !

कांता : कांहीं लाज वाटते का बोलायला ?

अंबादास : या बऱ्या चोराच्या अुलट्या आहेत–तुम्हांला करायला लाज वाटत नाहीं–आणि आम्हीं नुसतं बोलं देखील नये काय !

कांता : कुठून आलांत ? ठाण्याहून ?

अंबादास : म्हटलं कोल्हापूरहून आलोंय ! सात रुपये नअू आणे खर्च केले आहेत तिकीटाला !

कांता : मग आतां ठाण्याचं तिकीट काढा जा ! जातें मी !

अंबादास : जातां कुठं ? तो येअील ना ! का दोघेही रात्रीचे बाहेर भटकत असतां ? ( कांता त्याच्याकडे दांतओठ खाअून चिडून पहाते व जाअूं लागते. ) तुमचं नांव विचारण्याचं विसरलों मी ?

**कांता :** माय नेम अिज मलकाजान ऑफ आग्रा.

[ जाते.

**अंबादास :** मलकाजान ऑफ आग्रा! (खुर्चीवर मटकन अेकदम बसतो. व अुपरण्यानें तोंड पुसून थोडासा वारा घेतो.) दुसराही पुरावा अिथल्याअिथंच मिळाला. प्रत्यक्ष आलों म्हणून हें कळलं, नाहीं तर या कार्टीनें आपल्या आयुष्याचा नाश करून घेतला असता. लग्न करते आहे लग्न!

[ जाऊं लागतो, तोंच बन्सी येतो.

**बन्सी :** काय हो, काय काम आहे?

**अंबादास :** तूं कोण?

**बन्सी :** मी शेटचा नोकर आहे! पाहिजे काय तुम्हांला?

**अंबादास :** कांहीं नको, जें पाहिजे तें सगळं मिळालं बरं बाबा!

**बन्सी :** पण शेट आले तर नांव काय सांगूं तुमचं?

**अंबादास :** (क्षणभर विचारांत पडतो.) आतां काय नांव सांगून करायचंय! (नंतर कांहीं तरी मनांत निश्चय करून खिशांतलें अेक भेटपत्र बाहेर काढतो.) हें दे त्यांना!

[ जातो. बन्सी त्या पत्राकडे थोडा वेळ पहातो. व नंतर बाटल्यांत कांहीं पिण्याचें अुरलें आहे का तें पहातो. तोंच वासंती व कल्याण बोलत बोलत प्रवेश करतात.

**वासंती :** आतां हे काका सांपाडणार तरी कुठं! मघाशीं कॉलेजमधून मी अिथें आलें ते सरळ होस्टेलमध्येंच गेलें असतें तर गांठ नसती का पडली त्यांची? दीड तास माझी वाट पहात बसले होते बिचारे—अन् माझा पत्ता नाहीं! काय वाटलं असेल त्यांना!

**कल्याण :** अे, बस कर तुझ्या काकांचं हें पुराण! मघांपासून तें काकांचें कीर्तन अैकून डोकं अुठून गेलं आहे माझं. तुझे काका मुंबअीला आले म्हणजे कांहीं भारताचे प्रेसिडेंट नाहीं अुतरले मुंबअी बंदरांत!

**वासंती :** माझ्या काकांबद्दल असं बोललेलं मला खपायचं नाहीं हं! माझे काका म्हणजे मला अगदीं वडिलांसारखे आहेत!

**कल्याण :** बरं बुवा, नाहीं बोलत! ते आले म्हणजे त्यांची पूजा करीन पाहिजे तर गंधफुलांनीं, मग झालं! सरदारगृहांत वाट पाहून पाहून कंटाळा आला मला! सिनेमाचा प्रोग्रॅमही बुडाला! आतां बसूं झालं अिथंच!

**वासंती :** (टेबलावरच्या वाटल्या व ग्लासेस पाहून) हा काय प्रकार आहे ?

**कल्याण :** (ओशाळून) ती आमच्या ऑफिसांतील मंडळी आली होती. आज परीक्षा पास झाल्याबद्दल पार्टी द्यावी लागली त्यांना !

**वासंती :** ही असली पार्टी द्यायची ! चांगली मंडळी आहेत ऑफिसांतली तुमच्या ! नेहमीं तुम्ही आपल्या मित्रांना असल्याच पार्ट्या देतां का अिथं !

**कल्याण :** छे, छे, भलतंच काय ? आजचा प्रसंग अगदीं निराळा होता म्हणून— तुला ठाअूक आहे कीं मी कांहीं पीत नाहीं.

**वासंती :** त्याचा वचपा मित्रमंडळींना हें पाजून काढतां होय ? म्हणूनच लोक तुमच्यासंबंधीं भलभलतं बडबडतात—

**कल्याण :** लोकांच्या बापाचं मी काय खातों आहें ? कांहीं केलं तरी लोक बडबडणारच ! हें पहा, माझा स्वभाव आहे अतिशय अुदार—आणि त्यांतून मित्रांचा मी फार लोभी आहें. आणि आपल्याला कोणाची भीडहि फारशी मोडवत नाहीं ! आज परीक्षा पास झालेलों मी ! ऑफीसची मंडळी अचानक घरीं आली—आग्रहच धरून बसली कीं आम्हांला हें पाहिजे म्हणून ! मग त्यांना नाहीं कसं म्हणूं ? रोज आम्हांला अेके ठिकाणीं कामं करावीं लागनात.

**वासंती :** तुम्हीं सांगतां तें मला कबूल आहे. पण हे तुमचे मित्र म्हणविणारे लोक तुमच्या घरीं अिथं येतात, तुमच्या पैशानं पितात, खातात, चैन करतात— आणि बाहेर गेल्यावर गांवांत तुमच्या नांवानं बदनामी करीत फिरतात याची तुम्हांला कांहीं जाणीव आहे का ? तुमच्या चांगुलपणाची लोकांना काय कल्पना ? त्यांना तुमच्याबद्दल जें ऐकूं येतं, तेंच खरं वाटणार. तुम्हाला लोकनिंदेची परवा नसली तरी तुमच्यावर प्रेम करणाऱ्या आमच्यासारख्यांना तरी तिच्या यातना फार सहन कराव्या लागतात.

जनभाषण कालकूट
  करि जीवन विषदूषित,
    जाळितसे प्रिय जीवा !
धवल चंद्रिकावदना,
  डाग केंवि लागावा ?
विमल जानकीस कसा,
  लोकदंश बाधावा !

मला दुसऱ्याचं कांहीं वाटत नाहीं–पण मला काकांचं भय वाटतं! त्यांच्या कानावर तुमच्यासंबंधीं हें गेलं नसलं, म्हणजे मिळविली!

**कल्याण :** असल्या खोट्या कंड्यावर विश्वास ठेवण्याअितके तुझे काका कांहीं मूर्ख नाहींत! किती केलं तरी ते तुझे काका आहेत!

**वासंती :** पण तुम्ही अशी कल्पना करा, कीं सहज कोणी अेखादा मनुष्य या ठिकाणीं आला–किंवा समजा काकाच माझे आले–आणि त्यांनी हा देखावा पाहिला, तर काय त्यांची कल्पना होअील! तुम्हीं जीव तोडून जरी त्यांना सांगितलंत कीं मी पीत नाहीं, तरी त्यांची समजूत होअील का?

**कल्याण :** हा–हा तो बन्सी गद्धा! बन्सी–बन्सी–( बन्सी येतो. ) गद्धया, तूं काय नोकरी करतोस का हजामती करतोस! हें कोण अुचलणार तुझा काका? चल, अुठव सगळं तें! तुझा बाप कुणी आला अिथं तर काय म्हणेल?

**बन्सी :** ( अेकदम थांबून ) थांबा–थांबा–आला होता अं—

**कल्याण }**
**वासंती }** : आला होता–कोण?

**बन्सी :** ( आठवण करीत ) काय त्यांचं नांव बघा–हो–हो (खिशांतून भेटपत्र काढून देत ) हें काय कार्ड त्यांनीं दिलं आहे!

**कल्याण** : ( अेकदम ) रावसाहेब अंबादास, कोल्हापूर!
**वासंती** : माझे काका!

[ वासंती अेकदम खुर्चीवरच कोसळते.

**कल्याण :** काय काका! म्हणजे येअून गेले का ते! कुठं, अिथं आले होते?

**बन्सी :** हो–( जागा दाखवीत ) अिथं अुभे होते!

**कल्याण :** तूं कुठं गेला होतास मरायला लेका! पाहिलं का त्यांनीं हें सगळं?

**वासंती :** नाहीं, डोळ्याला पट्टी बांधून आले होते तें! मी म्हणत होतें तसं झालं अगदीं! निकाल लागला आपल्या लग्नाचा आतां! नशिबानं चांगलाच दगा दिला–आतां माझ्या पत्राला काका काय अुत्तर देणार हें उघडच आहे.

**कल्याण :** छट्, छट्, मी फार नशिबवान् आहे! माझं नशीब मला कधींच दगा द्यायचं नाहीं! आणि शिवाय आज मी परीक्षा पास झालों आहे! आजची तेरा तारीख आहे! तेरा तारीख मला अत्यंत शुभ आहे! आज माझं कांहीं वाअीट होणं शक्य नाहीं! चल, आतांचे आतां आपण सरदारगृहांत जाअूं—

**वासंती :** तुम्ही नकों माझ्यावरोवर ! मी अेकटीच जातें ! काय काय गोष्टी वघून गेले आहेत ते येथून ! तसे काका स्वभावानं फार भोळे आणि प्रेमळ आहेत ! पण अेकदां का त्यांचा समज झाला आणि त्यांनीं डोक्यांत राख घातली म्हणजे त्यांची समजूत घालणं महा कठीण आहे. काय वाटेल तें झालं तरी मला त्यांची मनधरणी करून अिथं पुन्हां घेअून यायलाच पाहिजे. कारण माझं सर्वस्वाचं सुख त्यावर अवलंबून आहे. चला आटपा, ही घाण सारी घरांतून फेंकून द्या. कांहीं कुठं ठेवूं नका. कारण अेकादे वेळीं काकांच्या डोक्यांत आलं तर ते घराचा कोपरान् कोपरा धुंडाळल्याशिवाय रहाणार नाहींत.

**कल्याण :** तूं जा आतां–आणि त्यांना घेअून मात्र ये. साऱ्या घराचं देवघर करून टाकतों वघ. ( वासंती घाअीघाअीनें जाते. तिला पोंहोचवून तो लांब लांब टांगा टाकीत परत येतो. ) आतां ही वनकी चिडीया आधीं घरांतून वाहेर पिटाळली पाहिजे ! (दाराचें कुलूप पहायला जातो तों तें कुठें आहे ? दार अुघडेंच !) अरेच्या, हें कुलूप कुणी अुघडलं ? ( आंत डोकावून ) कांता, कांता ! म्हणजे, गेली कुठं ही ? आणि कुलूप कुणी काढलं हें ? वन्सी, वन्सी–( वन्सी येतो. ) अरे या खोलींतली वाअी काय झाली ?

**वन्सी :** आतां साहेव, मला तरी काय ठाअूक, तुमच्या खोलींत कोणती वाअी येते आणि कोणती वाअी जाते ?

[ वन्सी जातो.

**कल्याण :** मला वाटतं, कौशिक येअून तिला घेअून गेला असावा ! मग छान झालं ! परस्परच कटकट मिटली !

[ आंतून एका स्त्रीचे तारस्वरांतील शब्द अैकूं येतात–"मेलें–मेलें–वांचवा मला !" कल्याण अेकदम दचकून तिकडे कान देतो, तों अेक वीस अेकवीस वर्षांची सामान्य कुटुंबांतील अेक स्त्री धांवत आंत शिरते व कल्याणला पहातांच त्याचे पाय धरते. हिचें नांव गीता.

**गीता :** साहेव, वांचवा मला, मी तुमच्या पाया पडतें !

**कल्याण :** पण झालं काय ?

**गीता :** माझा नवरा माझा जीव घेतो आहे–लपवा मला लौकर !

[ अितक्यांत तिचा नवरा वाळाराम त्वेषानें धांवत आंत शिरतो.

**वाळाराम :** वेशरम, वाजारवसवी–दुसऱ्यांच्या घरांत शिरतेस–जीवच घेतों तुझा !

[ तिला धरायला जातो, तसा कल्याण त्याला मागें ढकलतो.

**कल्याण :** खबरदार, तिच्या अंगाला हात लावशील तर ! हो मागें—

**बाळाराम :** मी तिचा नवरा आहें–मी हिचा जीव घेअीन नाहीं तर काय वाटेल तें करीन ! नवराबायकोच्या भानगडींत तुम्हांला नेहमीं नेहमीं पडण्याचं कारण नाहीं साहेब !

**कल्याण :** चल होतोस कीं नाहीं बाहेर ! कां मारूं लाथ ! बायकोला मारतोस ! माणूस आहेस का हैवान !

[ त्याच्या अंगावर धांवून जातो.

**बाळाराम :** साहेब, हें चांगलं नाहीं–याचा सूड घेअीन मी !

**कल्याण :** (त्याला गचांडी देअून बाहेर काढतो.) सूड घेतो आहे लेकाचा !

[ बाळाराम शिव्या देत देत जातो.

**गीता :** (सद्‌गदित स्वरानें) साहेब, तुम्ही माझे धर्माचे भाअू आहांत ! दुसऱ्यांदां तुम्हीं मला वांचविलंत ! आज तर त्यांनीं माझा खूनच केला असता ! रोज रात्रीं हे दारू पिअून येतात–आणि हा प्रकार चालतो ! नको झाला आहे मला जीव !

**कल्याण :** हें पहा बाअी, तुमच्याबद्दल मला सहानुभूति आहे. तुम्हांला वाटेल ती मदत करायला मी तयार आहें. पण, आज अिथं आतां तुम्हांला फार वेळ बसतां यायचं नाहीं. मेहरबानगी करून तुम्ही दुसरीकडे कुठं तरी जा !

**गीता :** अशा रात्रीच्या वेळीं मी कुठं जाणार साहेब ? माझं कोणी, कोणी ओळखीचं नाहीं या शहरांत ! आणि ते खालीं रस्त्यावर अुभे असतील साहेब ! बाहेर गेलें आतां तर ते माझा गळाच कापतील ! त्या दिवशीं तुम्ही वांचविलंत, म्हणूनच पुन्हां तुमच्याकडे धांव घेतली ! कृपा करून आजची रात्र मला अिथं राहूं द्या—

**कल्याण :** रात्र ! छेः छेः, एक मिनिट देखील तुला अिथं रहातां यायचं नाहीं ! हें बघ, मी आहें अविवाहित सडाफटिंग ! तुझ्यासारख्या तिऱ्हाअीत बाअीनं या ठिकाणीं—

**गीता :** पण तुम्ही माझ्या भावासारखे आहांत...

**कल्याण :** तें सगळं खरं ! पण असल्या मानीव नात्यावर कोणी विश्वास ठेवत नाहीं हल्लींच्या काळीं ! तूं बाहेर चल आधीं !–खालीं माझ्या ओळखीचं बिऱ्हाड आहे–तिथं तुझी सोय करतों चल—

[ दोघे जाअूं लागतात, तोंच आंतून वासंती व अंबादास बोलत असल्याचा आवाज येतो, तसे ते थबकतात.

**वासंती :** पण काका, तुम्हीं आंत तर चला—

**अंबादास :** छेः, छेः, त्या माणसाच्या घरांत मी पाअूल सुद्धां टाकणार नाहीं फिरून !

**कल्याण :** अरे बापरे, आले वाटतं काका ! आतां मेलों ! टाकूं का या चवथ्या मजल्यावरून खालीं अुडी ! माझे आअी, चल पळ तिकडे ! तुला मीं वांचवलं—आतां मला कोण वांचवणार, तुझा बाप ? ( ती घाअीघाअीनें खोलींत जाते. कल्याण बाहेरून दार ओढून घेतो. ) त्या पलंगाखालीं लपून बस—अेवढासुद्धां आवाज करूं नकोस—नाहीं तर वाजतील तुझ्या त्या बांगड्या !

[ तोंडावरची मुद्रा अेकदम बदलण्याचा प्रयत्न करतो. व कोपऱ्यांत तोंड वळवून कांहीं तरी कामांत गुंतल्याचा आविर्भाव आणतो. अितक्यांत वासंती अंबादासाचा हात धरून त्यांना आंत आणते.

**वासंती :** पण आंत यायला काय हरकत आहे ? निव्वळ गैरसमज झाला आहे तुमचा !

**अंबादास :** कांहीं गैरसमज झाला नाहीं माझा ! सगळा समज अगदीं योग्य कांहीं झाला आहे !

**वासंती :** ( अवसान आणून ) कल्याण, कल्याण, माझे काका आले ! कोपऱ्यावर भेटले मला ! विजेच्या जाहिराती पहात अुभे होते ! हे—हे कल्याण बरं का काका ! सॉलिसिटरची परीक्षा पास झाले आहेत आज ! ( कल्याण चुळबुळ करीत अुभा रहातो. त्याला हलक्या आवाजांत ) पाया पडा—पाया पडा—

[ कल्याण अंबादासाच्या पाया पडूं लागतो.

**अंबादास :** छेः, छेः, आतां पाया पडून कांहीं होणार नाहीं ! अेकदां ठरलं तें ठरलं !

**कल्याण :** नाहीं पण, मला अतिशय आनंद झाला आपल्याला बघून ! मघाशीं आपण आलांत—अन् मी नव्हतों—

**अंबादास :** हो तुम्हीं गेलां बाहेर नेहमींच्या पर्यटनाला ! बरे लौकर परतलांत ! मघाशीं तुम्ही अिथं नव्हतां तेंच बरं झालं. त्यामुळं साऱ्या गोष्टी मला शांतपणें पहायला मिळाल्या. ( अेकदम वळून ) अिथं—अिथं—त्या सगळ्या बाटल्या होत्या ! ( त्या नाहींत असं बघून ) अरेच्या, अिथलं तें बाटलीवाल्याचं इस्पितळ गेलं कुठं ?

**कल्याण :** मी तुम्हांला शपथेवर सांगतों कीं मी कधींच पीत नाहीं !

**अंबादास :** मग गोरगरिबांच्या कल्याणासाठीं तुम्ही घरांत ही पाणपोअी अुघडली आहे काय ?

**वासंती :** परीक्षा पास झाल्याची पार्टी होती त्यांच्या मित्रांना !

**अंबादास :** दारू प्यायची पार्टी ! मी खेडेगांवांतला म्हणून मला बनवतां काय ? मित्रांना पाजायला अेवढाच द्रव पदार्थ अुरला आहे कीं काय जगांत ! हं पहा कल्याण, आतां सॉलिसिटरचा धंदा करण्याअैवजीं कलालाचा धंदा करा !

**कल्याण :** तुम्हांला संशय येत असेल तर माझ्या तोंडाचा वास घेअून पहा कीं !

[ जवळ जाअूं लागतो.

**अंबादास :** मागं सर—भपकारा येतोय अिथपर्यंत—

**कल्याण :** वासंती, तूं बघ, येतो का माझ्या तोंडाला वास ?

**अंबादास :** अे, हट मागं ! माझ्या देखत माझ्या पुतणीच्या तोंडाजवळ तोंड नेतोस ! कांहीं लाज वाटते का ? ती तुझी मलकाजान आहे ना—तिच्याशीं कर तुझा सारा फाज़िलपणा—

**कल्याण :**
**वासंती :** } कोण मलकाजान ?

**अंबादास :** ती तुझी आग्रेवाली मलकाजान ! जिला त्या खोलींत कोंडून तूं मघाशीं बाहेर गेला होतास ती !

**वासंती :** काय, म्हणतां काय काका ?

**अंबादास :** तूं बोलूं नकोस गाढवे, मधीं ! तुला कवडीची अक्कल नाहीं ! यानं राजरोसपणें घरांत आग्र्याची अेक बाअी आणून ठेवली आहे—आणि वर आणखी लग्न करण्याचा विचार आहे या डाकूचा !

**कल्याण :** साफ खोटं आहे हं !

**अंबादास :** काय बदमाष आहेस ! मला फसवतोस ? कोल्हापूरचा आहें मी, असा फसायचा नाहीं ! या, या खोलींत त्या बाईला यानं कोंडून ठेवली होती, मीं स्वतः या हातानं दाराचं कुलुप अुघडलं आणि तिला बाहेर काढली ! आणि बेशरम, खोटं बोलतो आहेस माझ्यासमोर ! शपथ घेतोस का या खोलींत ती बाअी नव्हती म्हणून ! काढ तुझं जानवं आणि घे शपथ !

**कल्याण :** जानवं नाहीं, नाहीं तर घेतली असती शपथ !

**अंबादास :** काय, जानवं नाहीं तुला ? नरकांत तरी कोणत्या जाणार तूं ! छेः, छेः, यापुढं याचं तोंड पहाण्याची माझी अिच्छा नाहीं ! असल्या मागसांच्या गळयांत बांधण्यापेक्षां तुला कोल्हापूरला नेअून रंकाळ्याच्या तलावांत ढकलून देअीन ! चल–

[ तिला ओढूं लागतो, अितक्यांत बाळाराम पोलीसाला घेअून प्रवेश करतो.

**बाळाराम :** हाच तो अिसम ! यानंच माझी बायको आपल्या घरांत ठेवून दिली आहे—

[ अंबादास व वासंती अेकदम थबकतात.

**अंबादास :** अं, म्हणजे तुमची बायको काय ती ? बरोबर आहे–ठेविली आहे यानं !

**वासंती :** ( ओरडून ) काका–

**अंबादास :** गप्प बस ! भरला आतां पापाचा घडा !

**पोलीस :** आम्हांला तुमच्या घराची झडती घ्यावयाची आहे !

**कल्याण :** वारंट दाखविल्याशिवाय मी तुम्हांला आंत जाअूं देणार नाहीं !

**अंबादास :** अहो, पण ती आंत आहे कुठं ! मघाशींच गेली !

**बाळाराम :** गेली कुठली, आंत आहे ! ( कल्याणला ) तुला पकडायला वारंट लागत असलं, म्हणून बायकोला पकडायला नवऱ्याला वारंट लागत नाहीं !

[ जोरानें आंत खोलींत घुसतो. कल्याण त्याला अडवण्याचा प्रयत्न करतो, पण कांहीं अुपयोग होत नाहीं ! बाळाराम गीतेचा हात धरून बाहेर आणतो. ती जोरानें किंचाळते. तिला पहातांच सारे स्तंभित होतात.

**वासंती :** ही कोण ?

**अंबादास :** ही नाहीं ती !

[ कल्याण बोलायचा निष्फळ प्रयत्न करतो. पडदा पडतो.

# २

## प्रवेश पहिला

सरदारगृहांतील अंबादासांची खोली. दुसऱ्या दिवशीं सकाळीं आठ साडे-आठची वेळ. अंबादास स्मश्रू करवून घेत आहे. बाजूला अेका आरामखुर्चीवर वासंती बसली आहे व तिच्याशीं अंबादास मधून मधून बोलत आहे.

**अंबादास :** झोंपच नाहीं काल रात्रीं मुळीं ! येणार कुठून ? आधींच तो प्रकार पाहून माझं डोकं उठून गेलं ! तुला तिकडे पोहोंचवून मी सरळ अिथं आलों. अंगाचा घाम झाला होता. मुंबअीला तुमच्या घाम फार बरं का !

**न्हावी :** साहेब, बोलूं नका ! दाढी कापली म्हणजे मग ओरडाल !

**अंबादास :** बोलूं नको ? तूं कोण सांगणार मला बोलूं नको म्हणून ? दाढी कापली तर माझी कापेल–तुझ्या बापाचं काय जायचं त्यांत ! हे मुंबअीचे हजाम म्हणजे फारच शहाणे दिसतात !

**न्हावी :** साहेब, हजाम म्हणूं नका ! मी हजाम नाहीं !

**अंबादास :** हजाम नाहीं तर काय निजाम आहेस ! धोपटी आणि वस्तरा घेऊन हिंडतो आहेस !

**न्हावी :** धोपटी आहे का ही ? ब्याग आहे की—

**अंबादास :** तर तर ! म्हणे बॅग आहे ! बॅग घेतली म्हणजे काय बॅरिस्टर म्हणणार आहे काय कोणी तुला ! माकडानें विजार घातली म्हणून त्याला कोणी साहेब म्हणत नाहीं ! बॅग, नाहीं अगदीं ट्रंक डोक्यावर घेऊन हिंडलास तरी हजाम तो हजामच !

**न्हावी :** मुंबईला आम्हांला कारागीर म्हणतात !

**अंबादास :** गाढवाचं नांव गोपाळबोट ! कारागीर म्हणे कारागीर ! डोसक्याचे कारागीर ! चल आटप लौकर—बोलूं नकोस जास्ती ! ( न्हावी पुन्हां आपलें काम सुरू करतो. ) काय बोलत होतों मी—हां, तर तुला परत पोचवून मी परत अिथं खोलींत आलों. दिवा लावायला गेलों तर असा धक्का बसला त्या विजेचा ! डोळ्यापुढं काजवेच चमकले ! ( न्हाव्याचं काम संपतं. ) पंधरा मिनिटं खाकेंत हात घालून बसलों न् काय !

**न्हावी :** झालं साहेब !

**अंबादास** ( बगला वर करून ) हं—

**न्हावी :** हें नाहीं करत आम्ही ! पुण्या-सातारकडील न्हावी करतात तें ! उठा—

**अंबादास :** ( एकदम रागानें उठून ) नाहीं करीत ? मग देत नाहीं पैसे ! बगल नाहीं तर पैशाच्या कामांत बगल वर ! न्हावगंड तें न्हावगंड अन् मिजास केवढी लेकाच्याची ! मुंबईला आहेस म्हणून ! कोल्हापूरला आलास तर म्हशी भादरायला देखील कोणी बोलावणार नाहीं तुला ! चल निघ !

**वासंती :** देऊन टाका ना पैसे ! कशाला भांडताय त्याच्याशीं !

**अंबादास :** गप बस ! हजामतीच्या कामांत बोलूं नये बायकांनीं ! वाटेल तसे पैसे देऊन मुंबईच्या लोकांनीं या न्हाव्यांना डोक्यावर बसवून ठेवलें आहे ! होतोस कीं नाहीं बाहेर ? का फेकूं या वाटींतलं पाणी तुझ्या तोंडावर ?

**न्हावी :** ( भराभर सामान गुंडाळीत ) तुम्हीं नाहीं दिलेंत तर मॅनेजरकडून घेअीन-तुमच्या बिलांतले पैसे—

**अंबादास :** तर तर ! माझ्या बिलांतून पैसे घेतोय ! घेऊं दे तर खरं या हजामतीचं बिल मला, म्हणजे त्या मॅनेजरचीच हजामत करतों बिन पाण्यानं !

( न्हावी चरफडत जातो. ) नाशकाच्या न्हाव्यांचें क्षौर करणारा आहे मी ! असा मुंबअीच्या न्हाव्यांना डरतों आहे !

**वासंती :** ( विषय बदलण्याच्या हेतूनें ) तुमचं तें सांगायचं तसंच राहिलं !

**अंबादास :** अरे हो, खरंच कीं ! काय सांगत होतों मी—हं—तें रात्रीचं ! बरोबर. भूकही काल मला विशेष नव्हती. अिथली हवाच भारी चमत्कारिक ! तेव्हां मॅनेजरला जेवायचें नाहीं म्हणून सांगितलं—हो तेवढेच पैसे वांचले !

**वासंती :** म्हणजे अुपाशींच निजलां कीं काय मग ?

**अंबादास :** छे छे, कोल्हापुराहून निघतांना हिनें दशम्या अन् बेसन दिलं होतं ना बरोबर ! अजून निम्मा डबा तसाच शिल्लक आहे ! त्यांतलं थोडसं खाल्लं—पाणी प्यालों आणि पलंगावर पडलों—पण झोंप कांहीं येईना ! डोकं असं ठणठणत होतं; अितक्यांत शेजारच्या खोलींत आपले ते कोल्हापूरचे रावबहादूर—काय नांव त्यांचं—ते अुतरले होते—आतां गेले ते सकाळीं ! त्यांनीं मला अुठवलं न् काय ! म्हणाले, ' रावसाहेब, सिनेमाला चला ! ' मला रावसाहेब म्हणतात ते बरं का !

**वासंती :** असं का ?

**अंबादास :** तर रावबहादूर म्हणजे लाख माणूस ! माझ्यावर फार लोभ त्यांचा ! त्यांना हा विलायती सिनेमा कां पिक्चर म्हणतात तें बघायचा भारी शोक ! आतां त्यांनीं माझ्या खोलींत येअून मला आग्रहानं चला म्हटल्यावर मग नाहीं का म्हणतां येतंय ! उठलोंन् काय ! गेलों त्यांच्याबरोबर मोटारींतून कुठल्याशा थेटरांत काय थेटर होतं म्हणतां तें ! आणि बाहेर आरास तरी काय केली होती विजेच्या दिव्यांची ! वा रे वा ! आपले तर डोळे अगदीं दिपून गेले ! पण आंत गेलों तों काय अंधार गुडूप ! दिव्याखालीं अंधार म्हणतात तें कांहीं खोटं नाहीं ! मी म्हणतों, अंधारांत बसून हे लोक सिनेमा बघतात तरी कसे !

**वासंती :** ( गालांत हंसू दाबून ) मग काय झालं ?

**अंबादास :** तसाच काळोखांत आंत शिरलों ! मला बसायची मुळीं खुर्चीच दिसेना ! रावबहादूर म्हणाले बसा लौकर ! म्हणून बसलों झालं. अेका ठिकाणीं, तो काय, अेका लठ्ठ पारशिणीच्या मांडीवर ! ( हंसतो. ) खूप मजा झाली न् काय !

**वासंती :** ( हंसू आवरत ) मग आवडला कीं नाहीं सिनेमा तुम्हांला ?

**अंबादास :** छट् ! कांहीं अेक आवडलं नाहीं मला त्यांतलं ! काय त्या मडमा अन् काय ते साहेब ! नाचत काय होते अन् तंगड्या काय वर करीत होते ! मी

तर डोळे घट्ट मिटूनच बसलों होतों ! सभ्यता आहे काय या लोकांत ! चार वाक्यें नाहीं झालीं कीं मारल्या मिठ्या अन्–छे–तोंडानं अुच्चारायची देखील आम्हांला लाज वाटेत ! हंसतेस काय ! हा–हा सगळा विलायती तमाशा बघून तुम्ही तरुण लोक अगदीं विघडून गेलां आहांत ! तो पडद्यावरचा सारा प्रकार बघून मग माझ्या डोक्यांत प्रकाश पडला कीं थेटरांत अंधार कां करतात तें !

**वासंती :** गोष्ट तरी कसली होती ?

**अंबादास :** कोणाला ठाअूक ! आपल्याला त्यांतलं अेक अक्षर कळलं असेल तर शपथ ! कसे लोक हंसत होते अन् टाळ्या वाजवीत होते राम जाणे ! लुच्चे लेकाचे ! असे दाखवीत होते कीं जसा कांहीं प्रत्येक शब्दन् शब्द आपल्याला कळला. मी सांगतों तुला–आपण अेक शोध लावला आहे ! या साहेब लोकांना अिंग्रजी मुळींच बोलतां येत नाहीं !

**वासंती :** असं कसं म्हणतां ? त्यांची स्वत:ची भाषा त्यांना बोलतां येत नाहीं !

**अंबादास :** नाहीं–मुळींच नाहीं ! त्यांची भाषा आपण जितकी चांगली बोलतों तितकी त्यांना बोलतां येत नाहीं ! म्हणजे परवां असं झालं, माझ्या डब्यांत एक साहेब शिरला. मला पाहिल्यावर त्याला वाटलं कीं हा कोल्हापूरचा कोणी तरी अंमलदार असावा ! लागला माझ्याशीं तो अिंग्रजींत बोलायला न् काय ? मला आपणही त्याच्याशीं अिंग्रजींत बोलायला सुरवात केली ! आपण काय डरतोय ! आय् डोन्ट अफ्रेड ऑफ दीज् गोराज् ! तो अिंग्रजींत बोलतो आहे तर मी अिंग्रजींत बोलतां आहें ! डब्यांत सारे लोक टकमक पहात राहिले म्हटलं आमच्याकडे ! पण गंमत अशी कीं मी काय बोलत होतों तें त्याला अुत्तम समजत होतं, पण तो काय बोलत होता त्यांतलं मला अेक अक्षर कळत असेल तर शपथ ! शेवटीं मला शिव्या द्यायला लागला तेव्हां मला कळलं ! मीं म्हटलं 'साहेब, शिव्या देण्याचं काम नाहीं ! अिंग्रजी बोलतां येत नाहीं तें कबूल करा !' तेव्हां हंसलान् काय खुदकन् ! आम्ही त्याचं रहस्यच ओळखलंन् मग करणार काय तो ?

**वासंती :** ( मध्येंच अेकदम अुठून ) काका, रक्त आलं वाटतं तुमच्या गालाला—

**अंबादास :** हे–हे तुमचे मुंबअीचे न्हावी–अुगीच म्हणतों मी ! ( वासंती आपली बॅग अुघडते व पावडरची डबी काढून त्यांतली पावडर त्यांच्या गालावर कापलेल्या ठिकाणीं लावते. ) ही–ही पावडर कशाला वाळगतेस जवळ ! ही

तोंडाला फासतेस हाय रोज? तरीच दिसतेस अेवढं पांढरी फटफटीत! मी म्हणतोंय मुंबअीला येऊन गोरीबिरी झालीस कीं काय! पाहूं काय काय भानगडी भरल्या आहेस या तुझ्या विलायती झोळण्यांत!–( बॅग उघडून त्यांतील अेक अेक जिन्नस बाहेर काढतो.) त्या गाढवाचीं पत्रंबित्रं ठेवलीं नाहींत ना यांत? अँ–काय ग हें? हें–हें सेफटी वस्तऱ्याचं पातं कशाला ठेवलं आहेस यांत?

**वासंती :** पेन्सीली करायला—

**अंबादास :** पेन्सीली करायला वस्तऱ्याचं पातं! मला बनवतेस होय! मुंबअीला येऊन चांगली तयार झालीस अं तूं! (तिच्या चेहऱ्याकडे रोखून पहातो, तों कपाळावरील कापलेल्या केसांकडे लक्ष जातें.) हीं-हीं झुलपं कापायला कुठं शिकलीस? यांनीं कापलीस का दुकानांत जाऊन कापून घेतलीस?

**वासंती :** छे, दुकानांत का कोणी जातं?

**अंबादास :** नाहीं का? मी तर अैकलं होतं कीं मुंबअींतल्या पुष्कळ मुली आतां राजरोजपणें न्हाव्याच्या दुकानांत जाअूं लागल्या आहेत म्हणून!–अन् काय ग, या–या डोक्यावर तुझीं शिंगं कुठं दिसत नाहींत तें!

**वासंती :** शिंगं? म्हणजे काय?

**अंबादास :** नाहीं म्हटलं, पाठीवर हें शेपूट लोंबतं आहे गोंडेदार, तेव्हां मला मला वाटलं कीं शिंगंबिंगं उगवलीं आहेत कीं काय तुझ्या डोक्यावर! हल्लीं जी पोरगी पहावी तिच्या पाठीवर आपलं सव्वाहात शेंपूट हें आहेच! अन् या तुझ्या चोळीच्या बाह्या ग कुठं आहेत? का, शिंपी लावायलाच मुळीं विसरला?

**वासंती :** पुरे झाली थट्टा काका!

**अंबादास :** मग लाज नाहीं वाटत असलीं थेरंथेरं करायला? काय हे तुझे केस अन् हें मोहरीअेवढं कुंकू–अन् हें त्रिनकासोट्याचं पातळ का पंचा! असला अवतार करून रस्त्यावरून चाललांत म्हणजे कां नाहीं लोक तुमच्याकडे पहाणार टकमका! मग पुरुष आमच्याकडे वळून वळून पहातात म्हणून कां बोंब मारीत असतां त्यांच्या नांवानं? कोण म्हणेल तुला ब्राह्मणाची आहेस म्हणून?

**वासंती :** मुंबअीची हीच फॅशन आहे!

**अंबादास :** आग लाव तुझ्या त्या फॅशनला! फॅशनचा टेंभा मला दाखवतेस? तें कांहीं नाहीं–अुद्यांचें अुद्यां तुला कोल्हापूरला घेअून जातों! मुंबअीची फॅशन आतां बंद–यापुढें कोल्हापूरची अंबाबाअी फॅशन!

**वासंती :** (खालीं पहात) सध्यां तरी मी कोल्हापूरला येअूं शकत नाहीं!

**अंबादास :** शकत नाहीं ? कां हो, काय झालं ? तुमचे पाय मोडले का रेल्वेच्या फांट्याला आग लागली ! म्हणे, शकत नाहीं ! हें शेंपूट धरून फ़रफरा ओढीत नेअीन अिथून तेव्हां शकत येशील ! म्हणे, शकत नाहीं !

**वासंती :** काका–तुम्ही मला मारा–झोडपा–काय वाटेल तें करा, पण कल्याणला सोडून—

**अंबादास :** गाढवे, अजून तें वेड आहेच का तुझ्या डोक्यांत ? काल अेवढा सगळा प्रकार तूं प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहिलास, तरी तुला त्या माणसाबद्दल प्रेम वाटतं ? आतां बी. अे. होणार तूं ! तुला अजून माणसाची पारख करण्याची अक्कल आली नाहीं ! काय चुलींत घालायचंय तुझं तें शिक्षण !

**वासंती :** नाहीं काका, कल्याणाविषयीं तुमचा निव्वळ गैरसमज झाला आहे. त्यांच्यासारखा शुद्ध, दिलदार आणि बुद्धिमान् पुरुष लाखांत अेक मिळायचा नाहीं ! आज नाहीं अुद्यां, त्यांचा निर्दोषीपणा तुम्हांला पटल्यावांचून रहाणारच नाहीं.

**अंबादास :** व्यसनाच्या चिखलांत गळ्यापर्यंत रुतून बसला आहे तो ! त्याचा निर्दोषीपणा मला पटणार ! घटकेघटकेला ज्याला बाटली अन् बाअी लागते– अेवढंच काय पण दिवसाढवळ्या दुसऱ्याच्या बायका जो बेधडकपणें आपल्या घरांत पळवून आणतो, अशा बदमाष, बदफैली अन् दारुड्या माणसाच्या पावित्र्याची थोरवी माझ्यापुढं गातेस ?

**वासंती :** तुम्ही त्यांच्याविषयीं काय वाटेल तें बोललांत तरी माझं त्यांच्या-विषयींचं प्रेम नाहींसं होणं शक्य नाहीं ! जें बदलतं–जें कमी होतं–जें नाहींसं होतं त्याला का कोणी प्रेम म्हणतात ? जगांतलं सारं गरळ जरी ओतलंत तरी प्रेमाच्या पुष्करणींतलं तीर्थ कालत्रयींही कलुषित होणं शक्य नाहीं !

विझे का कधीं ही ज्वाला
  खऱ्या प्रीतीची बोला ?
धांवे भरारा वारा,
  तुटती नभींच्या तारा !
असे सागरा कुठें थारा ?
  भिववीत प्रीती कलिकाला !

माझं त्यांच्यावर प्रेम बसलं आहे काका !

**अंबादास :** प्रेम बसलं आहे ? बसलं असेल प्रेम तर अुठव त्याला ! प्रेम म्हणजे काय कावळा आहे का चिमणी आहे ? आपलं अुडालं हवेंत की बसलं जाअून कुठंही ! ज्याचं नांव देखील कधीं अैकलं नाहीं असल्या या अुडाणटप्पूवर तुझं प्रेम बसलं अं ! आणि आम्ही—तुझ्या रक्तामांसाचे—तुझ्या नात्यागोत्याचे—आम्ही तुझे कोणी नाहीं काय ? तुझे आअीबाप वारले तेव्हां सहा महिन्यांची होतीस—तेव्हांपासून हिनं आणि मीं तुला हातावर घेअून वाढवली—लहानाची मोठी केली-तुझ्या बापानं मरते वेळीं मला शेजारीं बोलावून माझ्याकडून वचन घेतलं—म्हणून अिंग्रजी शिक्षणासाठीं अितकीं वर्षं तुला मुंबअीला ठेवली ! हाडाचीं काडं करून कष्ट केले तुझ्यासाठीं अितके, तुझ्या दुखण्याभाण्यांत रात्रीच्या रात्री जागून काढल्या—आम्ही तुझे कोणी नाहींत—जीव तोडून तुझ्या हितासाठीं अेवढें सांगतों ते आम्ही मात्र तुझे दावेदार—आणि हा—हा—

[ भावनेच्या भरांत म्हाताऱ्याचा गळा भरून येतो व त्याला बोलवत नाहीं. वासंती अेकदम त्याच्याजवळ जाते व त्याच्या गळ्यांत हात घालते.

**वासंती :** काका—काका, काय हें ? तुमच्यावर माझं अतिशय प्रेम आहे—तुमच्यासाठीं मी काय वाटेल तें करायला तयार आहें ! तुमच्या डोळ्यांतले हे अश्रु बघून माझ्या काळजाचं पाणी झालं अगदीं !

**अंबादास :** ( क्षणभर स्तब्ध राहून अंबादास आपले डोळे पुसतात व पूर्वीची वृत्ति धारण करितात. ) माझ्यासाठीं तूं काय वाटेल तें करायला तयार आहेस ना ? मग या माणसाशीं तूं यापुढं संबंध ठेवतां कामा नये अेवढीच माझी म्हाताऱ्याची अिच्छा आहे.

**वासंती :** असाच जर तुमचा आग्रह असेल तर मी तुमच्या समाधानासाठीं जन्मभर अविवाहित राहीन.

**अंबादास :** वेडी कुठली ! बायका का कुठं लग्नावांचून रहात असतात ? ब्रह्मचर्य पाळायला तूं काय आमच्यासारखी पुरुष आहेस ! आपल्या हिंदु लोकांच्या व्याकरणांत स्त्री या शब्दाचीं दोनच रूपं आहेत. अेक सौभाग्यवती अन् दुसरी विधवा. अविवाहित स्त्री या शब्दाचा मुळीं अर्थच दिला नाहीं आपल्या कोशांत ! कोल्हापूरला गेल्यावर मी खटपटीलाच लागणार तुझ्या लग्नाच्या—

**वासंती :** नाहीं काका, मी कल्याणशीं लग्न करूं नयें अशी जर तुमची अिच्छा असेल, तर अविवाहित राहिल्यावांचून मला गत्यंतरच नाहीं. दुसऱ्या पुरुषाशीं

लग्न करणें शक्यच नाहीं मला. कसं होओील तें ? मी त्यांना आपलं हृदय कधींच देअून टाकलं आहे.

**अंबादास :** हृदय देअून टाकलं आहे ! म्हणजे काय बुवा ? अन् देअून टाकलं असशील तर परत घे मागून ! आपलं हृदय दुसऱ्याला देअून टाकण्याचं कारण काय ? हृदय म्हणजे कांहीं पुस्तक नाहीं कीं पैसा नाहीं—कीं घेतलें हातांत नि देअून टाकलं दुसऱ्याला ! छट्, वेडी कुठली ! आणि तुझं हृदय अुसनवार मागून घ्यायला त्याच्याजवळ स्वत:चं हृदय नव्हतं कीं काय ? बरोबर, तसंच असलं पाहिजे. आतांचे आतां त्याला पत्र लिहून मागून घे आपलं हृदय—अितक्या दिवस दुसऱ्याकडे ठेवायचं म्हणजे काय ?

**वासंती :** ( त्यांचे गालगुच्चे काढीत ) अगदीं वेडे आहेत माझे काका, अेकदां आपलं हृदय दुसऱ्याला देअून टाकलं कीं नाहीं काका—म्हणजे तें परत घेतांच येत नाहीं—कसं सांगूं तुम्हांला ?

**अंबादास :** तर तर, परत घेतां येत नाहीं ? फिर्याद करून घेअीन ? अजून तर कांहीं देणं मुदतीबाहेर गेलेलं नाहीं ना ? मी वेडा आहे काय ! कानामागून आलेली तूं चिमुरडी मला सांगतेस ! या सगळ्या गोष्टीचं मी तत्त्व काढलं आहे. कांहीं म्हणालीस तरी तुम्हीं अलीकडच्या पोरी महामूर्ख आहांत ! दोन पैशाचा आंकडा अन् चार पैशांची फणी विकत घ्यायची म्हणजे तुम्हांला चार चार घंटे लागतात अन् नवरा निवडायचा म्हटला म्हणजे अगदीं एका मिनिटांत होय ना ! हात् तुमचा !

[ दोघेही अेकमेकांना मिठी मारून हंसतात. अितक्यांत भांडूप व मुळुंद प्रवेश करतात.

**भांडूप :** काय रावसाहेब, आलों कीं नाहीं आम्ही काल सांगितल्याप्रमाणें. ओळखलं नाहींत वाटतं ? अहो, काल रात्रीं कल्याणच्या घरांत—

**अंबादास :** वा, वा, तुम्हांला ओळखलं नाहीं असं कसें होओील ! अेकदा आपण माणूस बघितला कीं ( डोक्याला हात लावून ) ठेवलाच अिथं ! बाकी काय हो, काल रात्रीं तुमचा चेहरा जरा निराळाच दिसत होता !

**भांडूप :** तुम्हांला माहीत नाहीं. मुंबअीच्या माणसांचे चेहरे रात्रीं निराळेच दिसतात—ह्या आपल्या विजेच्या प्रकाशानं.

**अंबादास :** असं ना ! तरीच काल रात्रीं मला सगळंच निराळं दिसूं लागलं ! म्हटलं माझी दृष्टीच बिघडली कीं काय ? आतां आम्हांला साठी लागायला कांहीं

फारसा अवकाश नाहीं म्हणा-अेवढंच कशाला, ही आमची पुतणी-अिथं कॉलेजांत शिकत असते !—

[ भांड्रप व मुळुंद तिला अदबीनें नमस्कार करतात. वासंती त्यांच्याकडे ढुंकूनही बघत नाहीं.

**भांड्रप :**
**मुळुंद :** } असं-असं, याच का त्या ?

**अंबादास :** हिला देखील मीं काल प्रथम ओळखलीच नाहीं ना ! काय तुमचं नांव म्हणालांत ? अरे हो, काल त्या गडबडींत मी तुमचं नांव विचारायचं अजीबातच विसरून गेलों.

**भांड्रप :** माझं नांव भगवंतराव भांड्रप; हे माझे मित्र मार्तंडराव मुळुंद. आम्ही आणि आपले कल्याण-सारी मंडळी अेकाच ठिकाणीं नोकरीला आहोंत-म्हणजे पेस्तनजी भाअीलाल सॉलिसीटर्स कंपनींत !

**अंबादास :** काय म्हणतां ? हें नाहीं तुम्हीं मला काल सांगितलंत ? मग तुम्हांला तर त्या कल्याणाची अगदीं खडान् खडा माहिती असेल !

**मुळुंद :** वा देवा, म्हणजे काय ? अितकीं वर्षं आम्ही अेके ठिकाणीं कामं करतों आहोंत—

**अंबादास :** मग तुमची गांठ पडली हें सोन्याहून पिवळं झालं. आणि आतां तुम्ही अिथं आलांत हें तर अगदीं नंबर वन् काम झालं. हें बघा, असं समजा कीं मी अेक या शहरांत अगदीं नवखा माणूस आहें. मला तुमच्या त्या कल्याणची कांहीं अेक माहिती नाहीं. पण तुम्ही तर त्यांना चांगलं ओळखतां ! मग आतां तुम्हीच हिला सांगा म्हणजे झालं ! त्या कल्याणशींच मी लग्न करणार असा ही हट्ट धरून बसली आहे—

**भांड्रप :** काय म्हणतां ? मग यांत वाअीट काय आहे ? फार अुत्तम गोष्ट आहे ही !

**अंबादास :** अुत्तम ! अहो काय-बोलतां कांय तुम्ही !

**मुळुंद :** हें पहा देवा, कल्याणसारखं स्थळ मिळायचं नाहीं तुम्हांला ! जोडा असा अुत्तम शोभेल-काय भांड्रप ?

**भांड्रप :** म्हणजे, काय प्रश्न आहे काय ? कल्याणसारखा देखणा, हुषार, कर्तबगार अन् धडाडीचा जांवअी मिळणार कुठं तुम्हांला दुसरीकडे ? हें स्थळ तुम्ही दवडूं नका रावसाहेब !

**वासंती** : ( हंसून ) आतां काय म्हणणं आहे काका, तुमचं ?

**अंबादास** : तूं गप्प बस ! मग हें पहा मंडळी, हेंच जर कल्याणबद्दल तुमचं मत असेल तर कांहीं अेक माहिती नाहीं तुम्हांला त्याच्याबद्दल ! किंवा असलीच माहिती तर जाणून बुजून ती तुम्ही माझ्यापासून लपवून ठेवतां आहांत !

**भांडूप** : हें तर केव्हांही होणारच ! आम्ही त्याचे जीवश्चकंठश्च मित्र, आम्ही त्याच्या दोषावर पांघरूण घालणार नाहीं, तर घालणार कोण दुसरं ?

**मुलुंद** : तुम्हांला काय वाटलं कीं तुम्ही विचारल्याबरोबर आम्हीं कल्याणच्या साऱ्या भानगडी पटापट सांगून मोकळे होऊं होय ? वा, देवा, खूपच कल्पना केली तुम्हीं आमच्याबद्दल !

**भांडूप** : हें पहा, आम्ही त्याचे जानी दोस्त आहोंत—आम्हांला त्याच्याबद्दल वाटेल तें माहीत असलं तरी प्राण गेला तरी आमच्या तोंडून अवाक्षर निघायचं नाहीं त्या संबंधीं !

**मुलुंद** : आणि मी म्हणतों, जगांत सर्वगुणसंपन्न आहे कोण लेकाचा ? माणूस म्हटला कीं त्याच्या अंगांत दोष हे असायचेच ! काय देवा ?

**भांडूप** : हें पहा रावसाहेब, मी सांगतों तुम्हांला. कल्याणच्या अंगांत काय वाटेल ते दोष असले—काय आहेत तें मी सांगत नाहीं—आमचा तो धर्म नाहीं—तरी त्या दोषांकडे या वेळीं दुर्लक्ष करणें हेंच आपल्यासारख्याच्या थोरपणाला शोभण्यासारखं आहे.

**अंबादास** : हें पहा मुंबअीकर, म्हटलें तुमची अक्कल चौपाटीवर हवा खायला गेलेली दिसते आहे ! त्याच्या दोषांकडे मी दुर्लक्ष करूं म्हणतां ! कोणकोणत्या दोषांकडे दुर्लक्ष करूं तें तरीं सांगा ! सांजसकाळ दारूच्या निशेंत तो टेर असतो तिकडे दुर्लक्ष करूं—

**वासंती** : खोटं आहे तें अगदीं !

**अंबादास** : ( रागानें ) तूं बोलं नकोस मधीं ! का घरामध्यें राजरोसपणें त्यानें बाअी आणून ठेवलेली आहे तिकडे दुर्लक्ष करूं—का दिवसाढवळ्या शेजाऱ्या-पाजाऱ्यांच्या बायका पळवून तो आणूं लागला आहे तिकडे डोळेझांक करूं ?

**भांडूप** : म्हणजे, कुणासंबंधीं तुम्ही बोलतां आहांत हें ?

**अंबादास** : तुमच्या—ह्या—ह्या जीवश्चकंठश्च जानी दोस्तासंबंधीं !

**मुलुंद** : काय म्हणतां !

**भांडूप** : छेः, साफ खोटं आहे हें—

**अंबादास :** खोटं आहे! मला फसवितां काय? म्हणजे तो दारू पितो हें तुम्हांला ठाऊक नाहीं?

**भांडूप :** नाहीं बुवा! काय हो मुलुंद?

**मुलुंद :** तसं माझ्या कानावर अेकदां आलं होतं—पण आपला कांहीं त्याच्यावर विश्वास बसला नाहीं.

**अंबादास :** काल संध्याकाळीं त्याच्या घरीं प्रत्यक्ष मीं डोळ्यांनीं पाहिलेल्या गोष्टी आहेत या! मला दुसऱ्यानं येअून सांगण्याची जरूरीच नाहीं?

**मुलुंद :** काय म्हणतां? मग आमचं बोलणंच खुंटलं! काय भांडूप, रावसाहेबांनीं जिथं प्रत्यक्षच सारा प्रकार पाहिला तिथं आपल्याला 'नाहीं' म्हणून बोलायला काय तोंड आहे?

**अंबादास :** आणि हे देखील होतेच कीं तिथं—यांना काय माहिती नाहीं?

**भांडूप :** छेः छेः, मी आपला ऑफिसचे कागद द्यायला गेलों होतों! ते ठेवले तिथं आणि तुमच्या देखतच परत फिरलों, आपण कोणाच्या घरांत गेलों तर अिकडचं तिकडं पहात नाहीं. सरळ डोळ्यांनीं जायचं आणि काम झालं कीं त्याच पावलीं तस्सं माघारीं यायचं—आणि त्यांतूनही दिसलंच कांहीं अेकादं, तर त्याबद्दल चुकून कधीं अवाक्षरही काढायचं नाहीं! आपला हा पहिल्यापासून मुळीं स्वभावच!

**मुलुंद :** बाकी रावसाहेबांच्या हुषारीची तारीफ करावी तेवढी थोडीच आहे! वर्षानुवर्षं आम्ही कामें करतों आहोंत त्याच्याबरोबर, पण आम्हांला ज्या गोष्टींचा कधीं पत्ता लागला नाहीं ती रावसाहेबांनीं अेका दिवसांत हुडकून काढली! कांहीं म्हणा तुम्ही भांडूप; जुनीं माणसं तीं जुनीं माणसं! त्यांची सर आपल्याला कांहीं यायची नाहीं!

**भांडूप :** आपल्याला देखील तें यापूर्वींच कळलं असतं! पण आपण दुसऱ्याच्या भानगडींत पडतों आहोंत कशाला! ज्याचा तो जाणे! आपल्याला करायचंय काय? आपलं काम भलें कीं आपण भले! बाकी खरं सांगायचं रावसाहेब, आम्ही शेजारीं शेजारीं कामें करतों आहोंत अितकीं वर्षें, पण आम्हांला त्याच्या तोंडाचा कधीं चुकून वास आला नाहीं!

**मुलुंद :** आणि आला असला वास, तरी तो आपल्याला काय कळणार! दारूचा वास आपल्याला कसा कळणार रे!

वासंती : कल्याण स्पर्श देखील करीत नाहीं दारूला ! काल संध्याकाळीं तुमच्याच ऑफिसांतले सगळे दारुडे कारकून तिथें शेण खायला गेले होते ! त्यांच्या पापाचीं फळं कल्याणला निस्तरावीं लागताहेत !

भांडूप : अस्सं—अस्सं—अस्सं ! आतां आलं लक्ष्यांत अं मुळुंद ! म्हणजे, काल संध्याकाळीं आपल्या ऑफिसांतील मंडळी आपणा दोघांना चुकवून जी सटकली ती कल्याणच्याच घरीं गेलीं असली पाहिजेत ! काय हलकट आहेत लेकाचे, तिथें जाअून त्यांनीं हा प्रकार केला काय ?

मुळुंद : तरीच मला दुपारीं बाजूला नेअून सांगितलं वरं का या दोघा तिघांनीं, कीं आज संध्याकाळीं असा असा प्रकार आहे. तुम्ही आणि भांडूप ऑफिसांतून परस्पर तिकडेच या. मीं त्यांना तिथल्या तिथं स्पष्टपणें सांगितलं कीं आम्हीं दोघेहि कांहीं या पंथांतले नाहींत—तुम्हांला कुठं जायचं ते जा—काय खायचं तें खा—अन् प्यायचं तें प्या—आम्हांला सांगत देखील जाअूं नका !

वासंती : कोण मेले तेथें जाअून तें प्याले—मला भेटायला पाहिजे त्यांतले कुणी—चप्पलच मारीन अेकेकाला !

अंबादास : ही पिण्याची भानगड घटकाभर बाजूला राहूं द्या, पण या माणसानं आग्न्याची अेक मलकाजान आपल्या घरांत खुशाल आणून ठेवली आहे हें तरी तुम्हांला ठाअूक आहे का ?

वासंती : काय, सांगतां काय काका ?

भांडूप : नका बुवा, कांहीं सांगूं नका. ( कानावर हात ठेवून ) अैकवत नाहीं आम्हांला हें !

मुळुंद : आग्न्याची ! आग्न्याची नाहीं पण लखनौची का कुठली अेक बाअी त्याच्याकडे नेहमीं येत असल्याचं आमच्या कानावर आलं होतं मागें !

भांडूप : ( ओरडून ) गप्प बस कीं ! तुला काय करायचं तें सांगून ?

अंबादास : हें पहा, तुम्ही कितीही माझ्यापासून लपवण्याचा प्रयत्न केला म्हणून काय व्हायचं आहे ? आणि शेवटीं सर्वांवर कडी, म्हणजे काल रात्रीं चांगल्या अेका कुटुंबवत्सल माणसाची बायको त्यांनीं त्याच्या घरांतून काढून आणली—शेवटीं तिचा नवरा पोलिसला तिथें घेअून आला—आणि मुद्देमालासकट त्याला पकडला !

भांडूप : म्हणजे, त्या वेळीं तुम्हीं तिथें होतां कीं काय ?

**अंबादास :** प्रत्यक्ष डोळयासमोर घडलेल्या या गोष्टी ? अैकीव गोष्टीवर मी कधीं विश्वास ठेवीत नसतों. आतां बोला, अशा बदफैली, व्यसनी अन् बदमाष माणसाच्या दुर्गुणाकडे दुर्लक्ष करून मी माझी मुलगी त्याच्या गळयांत बांधूं का ?

**भांडूप :** आपण तरी अगदीं चाट झालों बुवा !

**मुकुंद :** तुम्हीं स्वतः डोळयांनीं पाहिलेल्या गोष्टी–आणि तुम्ही सांगतां आहांत म्हणून, नाहीं तर आमचा याच्यावर कधीं विश्वास बसला नसता !

**भांडूप :** बाकी कोणी कांहीं म्हणालं तरी कल्याण मूळचा कांहीं वाअीट नाहीं. व्यसनी लोकांच्या संगतीमुळें वाया गेला आहे, दुसरं काय ? मी त्याला किती दिवस सांगतों आहे कीं बाबा, तूं या लोकांच्या नादीं लागूं नकोस–नुकसान करून घेशील ! पण त्यांनीं अैकलं नाहीं–आतां घ्या ?

**मुकुंद :** हें मुंबअीचं वातावरणच असं. अिथं आपल्यासारखीं चांगलीं–चांगलीं माणसं देखील बिघडतात. मग कल्याणची तर गोष्टच बोलूं नका !

**भांडूप :** बाकी रावसाहेब, मीं तुम्हांला हें मात्र नक्की सांगतों, कीं त्याचं लग्न झालं तर तो कदाचित् सुधारेलही ! नाहीं कोणी म्हणावं ?

**मुकुंद :** बरोबर, लग्न झाल्यावर पुष्कळ लोक ताळयावर येतात. आणि शिवाय यांच्यासारखी हुषार बायको—

**अंबादास :** तर–तर ! स्वतःच्या मुलीचा बळी देअून त्याला सुधारण्याचें पुण्य मिळविण्याची गरज काय आपल्याला ? आतांपर्यंत त्याचं सारं चोरून चोरून चाललं होतं–पण काल सारं बेंड फुटलं ! पुढचा सारा प्रकार पहायला काल मी तिथं थांबलों नाहीं म्हणून–पण आतां कांहीं तो सुटत नाहीं यांतून !

**भांडूप :** मग पुढची सारी हकीगत मी सांगतों कीं तुम्हांला ! आपल्याला कांहीं कोणाची अुगाच बदनामी करायची नाहीं, पण आपण आमचे मित्र, आपल्याला खरं सांगायला कांहीं हरकत नाहीं ! तुम्ही गेलांत निघून, अन् नंतर पोलीस त्याला घेअून गेले ठाण्यावर—

**वासंती :** काय खोटं बोलातां ! कल्याण आतां घरीं आहेत !

**भांडूप :** आतां घरीं आहेत हें कबूल, पण मी जेव्हां काल रात्रीं जामीन राहिलों त्यांना, तेव्हां म्हटलं त्यांची सुटका झाली !

**मुकुंद :** कल्याणला या गोष्टीचा पत्ता नाहीं बरं का रावसाहेब ! त्याला अटक झाल्याची बातमी आम्हांला लागली रे लागली, तसे धांवत गेलों आम्ही पोलीस ठाण्यावर अन् परस्पर जामीन राहून त्याला तिकडे मोकळा करून टाकला.

आमचा मुळीं स्वभावच हा कीं मित्रांना काय मदत करायची असेल ती अगदीं गुप्तपणें! त्यावद्दल बभ्रा करायचा नाहीं! आतां तुम्हीं विचारलंत म्हणून सांगितलं?

**अंबादास :** मग आतां होणार काय पुढं?

**भांडूप :** व्हायचंय काय? भरलाच नवऱ्यानें खटला तर होअील पांचसहा महिन्यांची शिक्षा अन् पांचसातशें रुपये दंड. मी म्हणतों याच्यापेक्षां जास्तींत जास्त काय व्हायचं आहे!

**मुळुंद :** तथापि आम्ही त्या बाअीच्या नवऱ्याला भेटून अन् त्याची समजूत घालून बहुतेक हें प्रकरण आंतल्याआंतच मिटवून टाकण्याच्या प्रयत्नांत आहोंत.

**भांडूप :** काल रात्रीं डोळ्याला डोळा नाहीं आमच्या! मित्रावर असलं संकट आल्यानंतर कोणाला झोप येअील हो! त्याला या भानगडींतून कसा सहीसलामत वांचवावा याचा,आम्ही रात्रभर विचार करीत होतों.

**मुळुंद :** अजून देखील त्याच कामांत आहोंत आम्ही! अेवढा सुद्धां वेळ नाहीं! काल आपण यांना म्हणालांत म्हणून आम्ही आलों झालं! चला, भांडूप.

**भांडूप :** चला, आम्हांला राहून राहून वाअीट वाटतं अेवढंच कीं अितका चांगला मनुष्य वाया गेला!

**अंबादास :** जरा थांबा–आलों अं मी—

[ धाअीधाअीनें जातो.

**भांडूप :** (वासंतीस) आपली ओळख झाली, फार आनंद झाला! आपण अिथंच असतां नाहीं का?

**मुळुंद :** म्हणजे काय? कॉलेजमध्यें आहेत ना त्या अिथल्या! रोज संध्याकाळीं कुलाबा बीचवर तर हिंडायला येतात! बरोबर एक अुंचेलासा पारशी अिसम असतो—

**वासंती :** तुम्ही शुद्धीवर असतां का कधीं कुलाब्यावर हिंडायला जातांना? मी जन्मांत कधीं कोणंत्याही परजातीच्या पुरुषाबरोबर हिंडायला गेलें नाहीं!

**भांडूप :** मग दुसरं कोणी तरी असेल! माणसासारखीं माणसं पुष्कळ असूं शकतात! जाअूं द्या तें! आपण रहातां कुठं अिथं?

**वासंती :** कां, तुम्हांला काय करायचंय, मी कुठें रहातें तें!

**मुळुंद :** नाहीं, आपलं वाटलं कधीं तुमच्याकडे यावंसं, तर माहीत असावा आपला पत्ता!

मुळुंद : तसं कशाला ? अुद्यां तुम्हांला आणि रावसाहेबांना घरीं जेवायला बोलवायचं यांनीं ठरविलें आहे—

भांडूप : अुद्यांच नाहीं ! पुढं केव्हां तरी आपणा अुभयतांना बोलविण्याचा विचार आहे—

वासंती : मी राहतें गिरगांव पोलिस स्टेशनांत ! तिथं येत जा मला भेटायला !

मुळुंद : छान, याला म्हणतात विनोद ! नाहीं तर भांडूप, तुमची बायको !

भांडूप : म्हणूनच तर यांना म्हणत होतों, कीं आमच्या घरीं कधीं अधून मधून येत गेलांत, तर तुमच्या संगतीमुळें आमच्या हिला तरी थोडीशी अक्कल येअील !

मुळुंद : तुमच्याकडे कशाला बोलावतां आहांत यांना ! बसायला निवांत खोली देखील नाहीं अेकादी ! अन् शिवाय घरांत पोरवडा ! त्यापेक्षां तुम्ही आमच्या घरीं या ! माझी भेटायची वेळ सायंकाळी पांच ते आठ ! कोणत्याही दिवशीं आलांत तरी मी अेकटाच सांपडेन घरांत !

वासंती : माझ्या बुटांना पॉलिश लावायला गांवांत जेव्हां अेकही चांभार मिळणार नाहीं किनअी, तेव्हां येअीन मी तुमच्याकडे ! काय हो, तुम्ही मला समजलांत काय ? तुमच्यासारख्या संभावित बदमाषांना मी ओळखत नाहीं असं का तुम्हांला वाटतं ? काल रात्रीं कल्याणच्या घरांत प्यालेल्या दारूचा वास देखील गेला नाहीं तुमच्या तोंडांतला—आणि साळसूदपणाचा आव आणून तुम्ही त्यांची बदनामी करतां ! त्यांच्या खेटराजवळ बसायची तरी तुमची योग्यता आहे काय ?

भांडूप : घ्या मुळुंद ! आहे कीं नाहीं हा न्याय ! ज्याचं करायला जावं बरं तोच म्हणतो आपलं खरं ! प्रामाणिकपणं वागण्याची दुनियाच नाहीं ही बाबा !

मुळुंद : हें पहा, तुम्हीं आम्हांला काय वाटेल त्या शिव्या दिल्यांत तरी आम्हांला त्याबद्दल कांहींच म्हणायचं नाहीं. कल्याणची मैत्री पत्करल्यापासून लोकांच्या शिव्या खाण्याचा आम्हांला चांगलाच सराव झाला आहे.

भांडूप : लोक आम्हांला कल्याणबद्दल काय काय विचारतात तें कुठं तुम्हांला सांगत बसा ! पण आम्हीं चुकून कधीं अवाक्षर काढलें नाहीं त्याच्या विरुद्ध ! कल्याणसंबंधीं लोकमत काय आहे, ठाअूक आहे तुम्हांला ?

वासंती : तुमच्यासंबंधीं लोकांचं मत काय आहे हें ठाअूक आहे का तुम्हांला ? मी सांगतें. लोक म्हणतात, कीं तुमच्यासारखीं हलकट, बदमाष, पाजी, टवाळ-

खोर माणसं आढळायचीं नाहींत मुंबईंत! होतां कीं नाहीं चालते आतां! नाहीं तर काकांची ती कोल्हापुरी वहाण घेऊन टाळकं सडकीन अेकेकाचं!

[ त्यांच्या अंगावर धांवून जाते, तसे ते घाअीघाअीनें निघून जातात. ते गेल्यानंतर क्षणभर वासंती विचारमग्न स्थितींत अुभी रहाते व स्वतःशींच कांहीं तरी गुणगुणूं लागते. थोड्या वेळानें कल्याण प्रवेश करतो.

**कल्याण :** वासंती—

**वासंती :** ( त्याच्याकडे धांवत जाते ) कल्याण–कल्याण! कशी काढली असेल वरं मी कालची रात्र! प्रत्येक क्षणाला तुमच्याकडे धांवत यावं असं वाटत होतं!

**कल्याण :** अजून तुझं माझ्यावरचं प्रेम कायम आहे तर! आतां मला धीर आला!

**वासंती :** हीच का माझ्या प्रेमाबद्दल तुमची कल्पना?

**कल्याण :** काल संध्याकाळपासून मला अेकाद्या स्वप्नसृष्टींत वावरल्यासारखं वाटतं आहे. अेकाद्या नाटककाराला सुचणार नाहींत अशा अद्भुत घटना अेकामागून अेक अेका तासाचे अवधींत घडून आल्या. माझ्या नशिबावरचा माझा विश्वासच उडाल्यासारखा झाला आहे. सारं जग जरी फिरलं तरी मला त्याची परवा नाहीं, पण माझ्या प्रेमाची भाग्यलक्ष्मी जर का मला सोडून गेली—

**वासंती :** ( त्याच्या तोंडावर हात ठेवून ) प्रेम लक्ष्मीसारखें आंधळें असलें तरी तिच्यासारखें चंचल नाहीं!

हा दिव्य प्रेमतारा,
मन झुलवी, जन खुलवी, जिवास हंसवी!
झांकिति ढग जरि, चंद्रवदन परि, मालवि काय छवी?
चंचल ग्रहगण, फिरती निशिदिन, अढळचि प्रेमरवी!

सूर्याला खग्रास ग्रहण लागलं म्हणून पृथ्वीचं आकर्षण का कमी होतं, का तिच्या प्रेमाच्या प्रदक्षिणेंत खंड पडतो?

**कल्याण :** माझ्या प्रीतीची चंद्रिका जर माझ्या जीवनांतून मावळणार नसेल तर माझ्या कीर्तीला चिरंतन ग्रहण लागलें तरी त्याची मला परवा नाहीं. मनुष्य प्रीतीसाठीं जगत असतो, कीर्तीसाठीं नाहीं! कीर्ती निष्कारण मिळते आणि

विनाकारण जाते. तिच्या लोभासाठीं आपल्या प्रेमावर पाणी सोडायला कोण तयार होओील ?

[अंबादास घाओीघाओीनें येतो. कल्याण अेकदम बाजूला खिडकीपाशीं जाओून पाठमोरा उभा रहातो.

**अंबादास :** अे वासंती—वासंती—

**वासंती :** काय काका ?

**अंबादास :** ती शौचकूपांतील टाकी फुटली ! जा मॅनेजरला जाओून सांग ! चांगलीच भानगड झाली !

**वासंती :** म्हणजे, काय झालं काय ?

**अंबादास :** कशाला मी ती सांखळी ओढायला गेलों कोणास ठाओूक ! जें अेकदम धो—धो—धो पाणी सुरू झालं म्हणतेस—

**वासंती :** (मोठ्यानें हंसत) हात्तिच्या, सांखळी ओढली होय ? त्यांत घाबरायचं कांहीं कारण नाहीं काका ! तें तसंच असतं !

**अंबादास :** आतां माझ्या जीवांत जीव आला ! मला वाटलं सारा शौचकूपच फुटला कीं काय—तोंडचं पाणी पळालं ! म्हटलं आतां हा मालक घेणार सारा खर्च माझ्याकडून भरून ! छेः, ही मुंबओी म्हणजे अजब आहे ! न्हाव्यापासून शौचकूपापर्यंत साऱ्याच गोष्टी विचित्र !—अं, अन् तीं दोन स्टेशनं कुठं गडप झालीं ?

**वासंती :** कोणतीं स्टेशनं ?

**अंबादास :** तीं भांडूप का मुळुंद—अिथं आलीं होतीं तीं ! (कल्याणला बघून) आणि हा कोण !

**कल्याण :** मी कल्याण ! तुम्हांला भेटायला आलों आहें ! थांबा—क्षणभर आपलं आश्चर्य आवरून धरा ! वास्तविक कालचा सारा प्रकार आपण पाहिल्या-नंतर, मी तुमच्या भेटीला येणं फारच धाडसाचं आहे. आपला माझ्याबद्दल जो कांहीं ग्रह झाला असेल तो केवळ शाब्दिक खुलाशानं आतां नाहींसा होण्यासारखा नाहीं ! मला आपल्याला अेवढंच सांगायचं आहे कीं आपण आठ दिवसांचा अवधि मला द्याल तर ज्या परिस्थितीनं माझ्याभोंवतीं हा चक्रव्यूह अुभा केला आहे तीच परिस्थिति मला ह्या चक्रव्यूहांतून सुरक्षितपणें बाहेर कशी आणून सोडते तें मी आपल्याला दाखवीन.

**अंबादास :** म्हणजे तुमचं म्हणणं काय कीं तुम्ही अगदीं धुतल्या तांदुळासारखे शुद्ध असून, हा सारा निव्वळ पराचा कावळा आहे! असंच कीं नाहीं ? म्हणजे तुम्ही दारूला कधीं शिवत नाहीं-हिच्याखेरीज साऱ्या परस्त्रिया तुम्हांला मातेसमान आहेत-असंच तुम्हांला म्हणायचं आहे ना! मग मी तुम्हांला असं विचारतों, कीं आमच्या वयाला आतां साठ वर्षे होत आलीं-आमच्या आयुष्यांत कधीं अुत्पन्न झाली नाहीं ही असली परिस्थिति! कालपासून अिथं राहतों आम्हीं अेकटे! आमच्या खोलींत कां नाहीं अेकादी बाअी शिरत! काय चेष्टा आहे काय ? अुगीच बोलण्यांत काय अर्थ आहे ? लोक चार आण्यांचे चौदा आणे करतील; पण पावलीभार हिस्सा तरी तुमचा असलाच पाहिजे!

**कल्याण :** तुमच्या जगाचे नियम काय वाटेल ते असले तरी माझ्यावर आलेल्या आरोपांत पावलीचंच काय पण पैचेंही सत्य तुम्हांला आढळणार नाहीं! परिस्थितीच्या पोलादी पकडींत सांपडल्यामुळें निरपराधी माणसं फांसावर लटकल्याचीं अुदाहरणं कायद्यांत आहेत कीं नाहींत!

**अंबादास :** कायद्याच्या गोष्टी तुम्हीं मला सांगू नका! पंधरा वर्षं मी हायकोर्ट प्लीडरच्या परीक्षेला बसलेलों आहें. ठाअूक आहे ? तुमचा कायदाबियदा सगळा पाणी भरतो आहे माझ्या अिथं! हें पहा कल्याण, तुम्ही कायद्याची भाषा सोडा! सरळ व्यवहार म्हणून मी आतां अखेरचं तुम्हांला विचारतों! तुमच्याविषयीं चांगलं बोलणारा अेक माणूस जरी मला या शहरांत भेटला तरी मी माझं तुमच्याबद्दलचं मत बदलायला तयार आहे!

**कल्याण :** हात्तिच्या, अेवढंच! तुम्हीं आमच्या ऑफिसांतच या म्हणजे झालं! पेस्तनजी आणि भाअीलाल शेटपासून तों खालच्या पट्टेवाल्यापर्यंत अेक मनुष्य जर माझ्या विरुद्ध बोलणारा भेटला तर मी माझ्या प्रेमावर पाणी सोडायला तयार आहे!

**वासंती :** ( ओरडून ) कल्याण—

**अंबादास :** तूं गप्प बस! ( हात पुढं करून ) ठरलं बरं का हें! आतां यातलं अेक अक्षरही मागं पुढं नाहीं. चला जा तुम्ही, लागा कामाला—

**कल्याण :** बरं आहे, येतों मी!

[ जातो.

**वासंती :** काका घात केलांत तुम्ही माझा! अितका भोळा जीव—

**अंबादास :** भोळा जीव ? गद्धा आहे लेकाचा ! होऊं दे, त्याची हौस एकदां पुरी होऊं दे ! आज संध्याकाळचे आंत निकाल–कीं उद्यां थेट कोल्हापूर !

## प्रवेश दुसरा

चर्चगेट स्टेशन समोरील समुद्राकडे जाणारा राजरस्ता. त्या दिवशींची सायंकाळ. झावबा सामंत, अंबरनाथ पै व भिकोबा भाअिंदर प्रवेश करतात.

**झावबा :** हें पहा भाअिंदर, आपल्याच्यानं आतां एक पाऊलही पुढं टाकवत नाहीं ! कुलाब्याहून अिथपर्यंत पायीं रखडवीत आणलंस ! आतां प्यायलां तरी दे नाहीं तर—

**भाअिंदर :** ( कोठें तरी दुसरीकडे पहात ) अरे, ती बघ-ती बघ–लौकर ! हात तुझं ! गेली सुद्धां !

**झावबा :** काय ! टॅक्सी ?

**भाअिंदर :** टॅक्सी नाहीं बाअी ! म्हणे टॅक्सी ! टॅक्सीला काय बघायचंय ! कोणतं मॉडेल हें अंबरनाथ ?

**अंबरनाथ :** हें ना ! हें मलबार हिल नाअिन्टीन फिफ्टी !

**भाअिंदर :** आणि तें मघांचें—

**अंबरनाथ :** तें लांब बाही पोलकेवालें ! हद्द, तें आंग्रेवाडी नाअिन्टीन हंड्रेड् ॲन्ड वन्, व्हिक्टोरिया राणीच्या वेळचें !

**झावबा :** दोन तास मी अैकतों आहें–ही असली भाषा बोलतां आहांत ! मोटारीविषयीं बोलतां आहांत का बायकांविषयीं ?

**अंबरनाथ :** हें नाहीं तुला कळायचं ! आणि कळून फायदा काय ? ही भाषा समजायचं वय संपून गेलं तुझं ! कसा भिकोबाला तयार केला आहे बघ दोन तासांत ?

**झावबा :** डोकं ठिकाणावर आहे का त्याचं ! वेड लागलंय झालं त्याला ! पन्नाशीच्या घराला आला आहेस तूं भिकोबा ! तुला काय हें शोभतं ? अरे, कालपर्यंत पुरुषाकडे देखील मान वर करून तूं कधीं पाहिलं नाहींस ! आणि आज खुशाल डोळे ताणून आल्यागेल्या बायांकडे बेमुर्वतखोरपणें पहात

सुटला आहेस ! कांहीं शरम आहे का तुला ? हा-हा अंबरनाथ, तुझा उद्योग ! कुलावा दाखवून तूं या ब्राह्मणाचं टाळकं फिरवून टाकलं आहेस !

**अंबरनाथ :** आज याचा पुनर्जन्म झाला आहे पुनर्जन्म ! अितकीं वर्षं हा त्या कांदेवाडींतल्या अंधाऱ्या चाळींत अेकाद्या सुरवंटासारखं आयुष्य कंठीत होता ! कुलाब्याची हवा दाखवून आज या सुरवंटाचं फुलपांखरूं बनवलं आहे मी ! पहा, पंख देखील फुटले याला !

**झावबा :** छट्, पंख कांहीं नाहीं. पण शिंगं फुटल्याचा मला मघापासून संशय येऊं लागला आहे.

**भाअिंदर :** बेटा अंबरनाथ, आजपासून तूं आपला गुरु झालास ! प्रेमाचा गुरुमंत्र आज तूं मला दिलास आणि मोक्षाचा मार्ग दाखवलास ! नाहींतर हा भिकोबा त्या कांदेवाडीच्या नरकांत अस्सा शेवटपर्यंत कुजत आणि सडत पडला असता ! आज मला तूं स्वर्ग दाखवलास—स्वर्ग ! मुंबअींतल्या साऱ्या सौंदर्याचं प्रदर्शन रोज सायंकाळीं कुलाब्याच्या वाळवंटावर भरत असतां आजपर्यंत आम्हीं कर्मदरिद्री लोक भुलेश्वर, बाबुलनाथ, अन् माधवबाग करीत बसलों होतों—धिःकार असो आम्हांला !

**झावबा :** गेला—आतां मात्र हा ब्राह्मण कामांतून गेला ! तीन लग्नं केलेला हा पांचसात पोरांचा बाप आतां मात्र संसारांतून उठला ! भिकोबा—भिकोबा, या—या वयाला हा बायकांचा नाद शोभत नाहीं बरं !

**भाअिंदर :** हें पहा झावबा, बायकांच्या बाबतींत कोणत्याही पुरुषाचा कोणत्याही वयाला विश्वास धरूं नये हेंच खरें ! अेवढे मोठे ऋषि विश्वामित्र—हजारों वर्षं पंचाग्निसाधन करून तपश्चर्या करणारे—शेवटीं काय झालं त्यांचं ? बोला—निकाल लावला कीं नाहीं मेनकेनं त्यांचा ! मग तुम्हीं आम्हीं कोण त्यांच्यापुढं ? उगीच कशाला बोलतां आहांत ! बायका बघून ज्यांच्या तोंडाला पाणी सुटत नाहीं तो पुरुष डांबीस तरी असला पाहिजे नाहीं तर—

**अंबरनाथ :** ( झावबाच्या पाठीवर थाप मारून ) यांच्यासारखा तरी असला पाहिजे.

**भाअिंदर :** छेः छेः, आज अगदीं डोळ्यांचं पारणं फिटलं ! अिंद्राप्रमाणें अंगाला हजारों डोळे असते तर बरं झालं असतं असं घटकाभर वाटलं ! काय लक्षावधी सौंदर्यांचे नमुने पाहिले आज म्हणतां !

जन्मुनि आधिं कुलाबा पाहीं, मग जा सोनापुर भाई !
चौपाटीची नको शहाळीं, नको भेळ गंडेरी !
सौंदर्याचे नको पिठोरी नमुने ठाकुरद्वारी !
कांदेवाडीं चिखलवाडितील घाटी गोगलगाई !
नको पाहणें पर्करवाल्या लठ्ठ काळबादेवी !
खुल्या पोटऱ्या, दंड मोकळे अन् उघड्या पाठी !
लाल ओंठ अन् उंच बूट ही अशा पऱ्यांची दाटी !
मीनाक्षींचा चिराबझारच तिथं सुगंधी पाही !
लावण्याचा धोबितलावच !—टॉवर राजाभाई !

बस, गुरुमाउली, ठरलं ! आजपासून आपल्या नेतृत्वाखालीं या प्रेमाच्या दुनियेंत आपण पाऊल टाकणार !

**झावबा :** छान, काल तो वीरमंत्र मिळाला नाहीं तोंच आज हा गुरुमंत्र मिळाला ! निकाल लागला आतां ! भिकोबा, अजून विचार कर ! आतां आपलं वय होत आलं ! परलोकच्या चिठीची आपण वाट पहात बसायचं–प्रेमाच्या चिठीची नव्हे ! सोनापूरच्या वाटेकडे डोळे लावून बसायचं का कुलाब्याच्या ?

**भाथिंदर :** तूं बस सोनापूरच्या वाटेकडे डोळे लावून ! आपल्याला अजून पुष्कळ अवकाश आहे ! अुद्यांपासून आपण या अंबरनाथाप्रमाणें तरुण होण्याच्या मार्गाला लागणार !

**झावबा :** भले शाबास ! म्हणजे मदनमोहन मालवीयानीं मागें केला होता तसा तूंही कायाकल्पाचा प्रयोग करून घेण्याचा विचार करतो आहेस कीं काय !

**भाथिंदर :** ( अंबरनाथच्या खांद्यावर हात ठेवून ) हा माझा यापुढें गुरु ! हा सांगेल तो प्रयोग करायला आपण तयार आहोंत ! बोला, गुरुमाऊली, या आपल्या शिष्यानं काय करावं अशी आपली अिच्छा आहे ?

**अंबरनाथ :** प्रथम हे–हे तुझे कपडे शिवडीच्या ड्रेनेजमध्यें फेंकून द्यायला पाहिजेत आणि अुद्यांपासून अप–टु–डेट कोरे करकरीत कपडे अंगावर घालायला पाहिजेत ! असले कपडे घालून कुलाब्याला फिरायला गेलास तर गंडेरीवाला नाहीं तर चंपीवाला म्हणून कोणी तरी हांक मारील तुला !

**झावबा :** हें पहा, अंबरनाथ, कपड फार झालं तर हा बदलं शकेल—पण काय वाटेल तें केलं म्हणून याचें तोंड कसं बदलतां येअील !

**भाअिंदर :** म्हणजे, अितका आमचा चेहेरा टाकाऊ आहे कीं काय ?

**झावबा :** नाहीं—मदनाचा औरसपुत्र किनअी तूं ! आरशांत कधीं बघितला होतास का चेहेरा ?

**अंबरनाथ :** जाऊं द्या हो भिकोबा, या म्हाताऱ्याच्या म्हणण्याकडे काय लक्ष देतां आहांत ? हल्लींच्या पोरी सुंदर तोंडापेक्षां सुंदर पोषाखावरच जास्त खूष असतात ! प्रेमाच्या मुलुखगिरींत अेकाद्या पुरुषाला यश आलं तर त्याचं शेंकडा सत्तर श्रेय त्याच्या शिंप्याला द्यायला पाहिजे ! उत्तम पोरगी मिळवायच्या आधीं उत्तम शिंपी पैदा केला पाहिजे !

**भाअिंदर :** बरं—कबूल, तूं सांगशील त्या शिंप्याकडे, बनवशील तो पोषाख घालायची आपली तयारी आहे ! पुढं बोल—

**अंबरनाथ :** रोज सकाळीं उठून प्रथम दाढी खरडली पाहिजे—आणि या मिशा आधीं कटाप करून टाकल्या पाहिजेत !

**झावबा :** आणि शेंडी सुद्धां !

**भाअिंदर :** म्हणजे, मिशाचा आणि प्रेमाचा काय संबंध ?

**अंबरनाथ :** मिशांचा आणि प्रेमाचा फार निकट संबंध आहे ! मदनाच्या राज्यांत मिशांना हल्लीं मज्जाव आहे. प्रेमाच्या अमृताचे घोट घेतांना मिशांची मदत व्हायचे अैवजीं अडथळाच जास्त होण्याचा संभव आहे. म्हणजे, चहा पितांना अर्धाअधिक चहा ओठांना लागण्याअैवजीं मिशांना लागतो—तशीच स्थिति प्रेमाच्या बाबतींत व्हायची !

**झावबा :** आमच्या लहानपणीं मिशा नसलेल्या पुरुषाकडे पोरी ढुंकून देखील पहात नसत !

**अंबरनाथ :** पोरी पाहिल्या कीं मिशांना पीळ भरणाऱ्या धैर्यधर—विक्रांताचा तो केसाळ काळ हल्लीं खलास झाला आहे ! पूर्वीच्या काळीं पुरुषत्व हें मिशांनीं मोजलें जात असे. हल्लीं अैसपैस मिशा ही अजागळ मूर्खपणाची पहिल्या पानावरची जाहिरात समजली जाते !

**भाअिंदर :** बोलूं नका ! उद्यां सकाळीं या मिशांचा निकाल लागला म्हणून समजा ! पुढें बोला !

**अंबरनाथ :** झालं, अेवढी सारी जय्यत तयारी केली की रोज संध्याकाळीं या बाजूला समुद्र किनाऱ्यावर फिरायला येण्याचा शिरस्ता ठेवायचा ! फिरतांना दुसऱ्याचं लक्ष वेधण्यासाठीं चेहरा अगदीं गंभीर ठेवावा, मधून मधून योग्य वेळीं खोकत जावं, बायकांची गर्दी दिसल्यास त्यांच्यामधून जाण्याचा प्रयत्न करावा, अंग चोरण्याचं सोंग करून अेकाद्या पोरीला धक्का द्यावा व 'सो सॉरी' असं म्हणत जावं. विषण्ण चेहरा करून अेकाद्या बाकावर बसावं, नाहीं तर सूर्यास्ताच्या सुंदर देखाव्याकडे पाहून दुसऱ्याला अैकू येअील अशा स्वरांत 'ओ, हाअ् ग्लोरियस !' असे अुद्गार काढत जावेत ! शिवाय तुला गातांही येतेंच आहे !

**भाअिंदर :** म्हणजे काय, आमचं सारं बळ गळ्यांत ! पोरींची शक्ति डोळ्यांत अन् गवयाची गळ्यांत !

**अंबरनाथ :** मग फिरतां फिरतां अेकादी फक्कडशी तान भिरकावून देत जावी—

**झावबा :** म्हणजे पोरींची प्राप्ती झाली नाहीं तरी जाणारा येणाराकडून चार दोन पैशाची प्राप्ती होईल हें मात्र नक्की !

**अंबरनाथ :** असा पंधरा दिवस अव्याहत क्रम ठेवलास कीं सोळाव्या दिवशीं काम फत्ते ! आपला अनुभव आहे ! कधीं वाया जायचा नाहीं ! मुंबअी म्हणजे समुद्र आहे. कुठंही गळ टाकला तरी फुकट जायचा नाहीं ! निदान अेकादी मासळी तरी अडकल्याशिवाय रहायची नाहीं !

**भाअिंदर :** आपल्याला या फिरायला येणाऱ्या लोकांच्या गर्दीची भारी भीति वाटते ! जिथं जावं तिथं लोक आहेतच ! निवांत स्थळ असं कुठं नाहींच ! म्हणून म्हणतों, कुणी अेकाद्यानं पाहिलं तर निकाल लागायचा आमचा !

**अंबरनाथ :** चूक आहे ! अिथं गर्दी असली तरी ती तुमच्या--आमच्या सारख्याच लोकांची ! जो तो आपापल्या भानगडींत मश्गूल रहाणार ! तुमच्याकडे कशाला कोण पहातोय ! बाकी तुम्ही म्हणतां यांत थोडंसं सत्य आहे—नाहीं असं नाहीं ! प्रियाराधन करण्यासाठीं या मुंबअीला अेक देखील निवांत अशी जागा नाहीं ! कुठं अेकाद्या पोरीला घेऊन बसावं तों कोणी नाहीं तरी निदान 'बूट--पॉलिश' म्हणून अेकादं कार्ट नेमकं तिथं अुटपलंच म्हणून समजा ! पायांतला काढावासा वाटतो अशा वेळीं !

**भाअिंदर :** तेंच तर म्हणतों मी ! चार लोकांसमक्ष या भानगडी करण्याइतके आपण निर्ढावलों नाहींत तुझ्यासारखे !

**अंबरनाथ :** तें आपोआप धैर्य येतें माणसाला ! जरा दमादमानं घेतलं पाहिजे ! समुद्रकांठच्या वाळवंटांत हीं प्रीतीचीं धुळाक्षरें सुरवातीला गिरवलीं म्हणजे पुढचे प्रेमपाठ आपोआप मुखोद्गत होतील ! व मग कुलव्याला मारलेली शिकार जुहूला जाऊन कशी पकवायची हीं प्रेमाच्या अंकगणितांतील उदाहरणं तुला सहज सुटतील !

**झावबा :** हें पहा भिकोबा, ही पानपतच्या लढाओीची तयारी खूप झाली तुमची ! पण तिसरं लग्न करून घरांत जी अेक गाय आणून ठेविली आहे तिची काय वाट !

**अंबरनाथ :** तिला वेळच्या वेळीं वैरणपाणी मिळत जाअील–तिचा काय प्रश्न आहे ! काय भिकोबा, फारच दंगा करायला लागली कीं पांजरपोळ दाखवा म्हणजे झालं !

**भाअिंदर :** बेशक ! आपला तर लग्नसंस्थेवरचा आतां विश्वासच उडाला आहे ! नवरेगिरी म्हणजे कांहीं अेखाद्या पठाणासारखी रात्रपाळीची नोकरी नाहीं ! चोवीस घंटे ताबिलदारी पत्करावी लागते !

**अंबरनाथ :** म्हणूनच आपण या फंदांत कधीं पडलों नाहीं ! ( अेकदम ) अे–खामोष–ही कोण ? ( टवकरून बघतो. ) मंडळी, आटपा, आतां चालूं लागा पाहूं–सरळ ?

**झावबा :** म्हणजे, अेकदम झटका आल्याप्रमाणें असा तिऱ्हाअितासारखा काय बोलूं लागला आहेस ?

**अंबरनाथ :** जास्त विचारूं नका ! सावज आलं आपलं ! चला, उचला पाय ! नाहीं तर सकाळपासून केलेली ही तयारी फुकट जायची ! ( अेक पत्र खिशांतून काढतो. ) हें पाहिलंत पत्र ? कुणाचं अक्षर आहे ?

**भाअिंदर :** कल्याणचं ! अं, त्याचं पत्र तुझ्या हातांत कसं आलं ?

**अंबरनाथ :** पाठ थोपटा ! ही आमच्या लेखणीची करामत आहे म्हटलं !

**झावबा :** काय उलट्या काळजाचं कारटं आहे हें ! हें बनापट पत्र कशाला बाळगलं आहेस जवळ ?

**अंबरनाथ :** तिला द्यायला ! आतां विचारूं नका कांहीं–उद्यां सांगेन !

**भाअिंदर :** रेल्वेपुरते दोन आणे दे पाहूं–आज पैसे आणायचे विसरलों ! झावबाजवळ पास असेलच !

**झावबा :** आपण जन्मांत कधीं रेल्वेचा पास काढला नाहीं ! रेल्वेचाच काय पण कोणताही पास कधीं आपण काढला नाहीं ! आयुष्यांत आम्हांला अेकदांच पास

काढावा लागणार आहे-आणि तो शेवटचा! चल, दरिद्री लेकाचा-दोन आणे खिशांत नाहींत आणि लाखाच्या गप्पा!

[ त्याला ओढीत घेअून जातो. अंबरनाथ पोषाख साफसूफ करून अुभा रहातो. अितक्यांत कांता येते.

**अंबरनाथ :** गुड अीव्हनिंग बेन!

**कांता :** ओ गुड अीव्हनिंग! काय तुमचं नांव? पाहिल्यासारखं वाटतंय कुठं तरी!

**अंबरनाथ :** फार पूर्वी! जाअू द्या, तें नाहीं आतां आठवायचं. माझं नांव अंबरनाथ पै. कुणी मला पै म्हणतात, कुणी नाथ म्हणतात. आपण कांहींही म्हटलं तरी चालेल! मी कल्याणचा अतिशय विश्वासांतला मित्र आहें.

**कांता :** कोण कल्याण?

**अंबरनाथ :** म्हणजे, काल संध्याकाळचं विसरलांत वाटतं—

**कांता :** असं-असं-असं-ते होय! बरं मग?

**अंबरनाथ :** त्यांनीं आपल्याला द्यायला हें पत्र दिलं आहे मजजवळ! आपण रोज संध्याकाळीं अिकडे फिरायला येतां हें मला माहीत होतं, म्हणून मी अितका वेळ तुमचीच वाट पहात होतों!

**कांता :** पत्र! मला कल्याणनीं पत्र लिहिण्याचं काय कारण?

**अंबरनाथ :** वाचा म्हणजे कळेल!

[ कांता पत्र वाचते. तसा तिचा चेहरा अेकदम प्रफुल्लित होतो.

**कांता :** म्हणजे, खरं आहे हें! माझा तर माझ्या डोळ्यावर विश्वासच बसत नाहीं!

**अंबरनाथ :** काल आपण गेल्यापासून ते अेकसारखे आपलाच विचार करीत आहेत! जवळजवळ आपलं वेडच लागलं आहे त्यांना असं म्हणायला हरकत नाहीं!

**कांता :** मी त्यांना अितकी आवडलें असेन याची मला कल्पना नव्हती!

**अंबरनाथ :** म्हणजे आजपर्यंत तुमचं याबद्दल मुळींच बोलणं झालं नाहीं?

**कांता :** मुळींच नाहीं! काल तर त्यांना मीं पहिल्यांदा पाहिलं! चला, आतांचे आतां त्यांना मला भेटलं पाहिजे!

**अंबरनाथ :** थांबा, ऑफिसच्या कामासाठीं ते आतां कुठं बाहेर गेले आहेत! ते मोकळे असते तर आपल्याला अिथेंच येऊन नसते का भेटले? हें पहा, सुरवातीला उघडपणें त्यांना आपल्याला भेटतां येणार नाहीं. म्हणून कांहीं दिवस तरी मध्यस्त म्हणून आपल्याला माझ्याशींच संबंध ठेवावा लागेल. ( खिशांतून कार्ड काढून.)

हा माझा पत्ता ! रोज संध्याकाळीं सहाचे सुमारास तुम्ही माझ्या अिथं येत जा ! तिथंच ते तुम्हांला भेटण्याची मी व्यवस्था करतों, म्हणजे या कानाचा त्या कानाला पत्ता नको !

**कांता :** उद्यांपर्यंत मला कसा धीर निघेल तो निघो. बरं का मिस्टर पै !

**अंबरनाथ :** नाथ म्हणा कीं !

**कांता :** अितका आनंद मला जन्मांत कधीं झाला नव्हता !

**अंबरनाथ :** आम्हांला काय त्यांत फायदा ? चला सिनेमाला येतां का ? मी मोकळा आहें. ( अितक्यांत ' कांता ' अशी कौशिकची हांक येते ) हा कोण ?

**कांता :** माझे मित्र आहेत ते ! जा तुम्ही. मी उद्यां भेटेन तुम्हांला घरीं ! पण त्यांना नक्की यायला सांगा हं—

**अंबरनाथ :** ( आंबट चेहरा करून ) बरं आहे ! ( स्वतःशींच ) वाटलं तितकं सोपं नाहीं हें प्रकरण !

[ जातो.

**कौशिक** ( घाअीघाअीनें येतो. ) माफ कर हं ! कालपासून मी तुला शोधतों आहें ! खूप खूप रागावली असशील माझ्यावर !

**कांता :** तुझं तोंड पहायचं नाहीं असा मीं निश्चय केला आहे ! कांहीं लाज वाटते का ? खुशाल मला दुसऱ्याच्या घरीं सोडून चालता झालास तो आतां उगवलास ! कांहीं माणुसकी तरी आहे का तुझ्यांत ?

**कौशिक :** अग मी आलों होतों तिथं ! पण पोलीसची गर्दी पाहून मागचे मागें पळालों ! मला वाटलं तुझा मामा आपल्याला पकडण्यासाठीं पोलीस घेऊन तिथें आला कीं काय ?

**कांता :** तुझ्यासारख्या भ्याड अन् नादान माणसांशीं मी लग्न करीन असें तुला वाटलं तरी कसं ? बाकी, कल्याणची माझी तूं ओळख करून दिलीस याबद्दल मी तुझी फार आभारी आहें !

**कौशिक :** म्हणजे काय ?

**कांता :** कल्याणबरोबर लग्न करण्याचं मीं ठरविलं आहे !

**कौशिक :** वेड लागलंय काय तुला ? एक दिवस तरी झाला आहे का ओळख होऊन ?

**कांता :** मग तुझ्याशीं लग्न करायचं मीं ठरविलं त्यावेळीं कितीशी ओळख होती आपली ?

**कौशिक :** तूं खूप त्याच्याशीं लग्न करायला तयार होशील, पण कल्याण तुझ्याशीं लग्न करायला तयार झाला पाहिजे ना! तुझ्यासारख्या सतराशें छपन्न पोरी त्याच्या पायाशीं लोळत पडल्या आहेत!

**कांता :** भ्रम आहे तुमचा! ( अंबरनाथनें दिलेलें पत्र काढून ) हें पहा कल्याणचं प्रेमपत्र! त्यांनीं मला लिहिलेलं! वाचूं नका! अक्षर बघा, आहे ना त्याचं?

**कौशिक :** ( अेकदम क्रुद्ध चेहरा करून ) हरामखोर, अितका बदमाश आहे कल्याण? मित्राशीं विश्वासघात!

**कांता :** पटली खात्री! साहेबजी! यापुढें तुमचा माझा कांहीं अेक संबंध नाहीं! तुमचा आफ्रिकेचा पत्ता देअून ठेवा म्हणजे लग्नाचं निमंत्रण पाठवीन तुम्हांला तिकडे!

[ जाते. कौशिक हतबुद्ध होअून तिच्याकडे पहात अुभा राहतो.

## प्रवेश तिसरा

मे. पेस्तनजी, भाअीलाल सॉलिसिटरचें ऑफ़िस. दुपारीं तीन वाजण्याचा सुमार. ऑफिसांत नेहमींप्रमाणेंच कामाची खूपच गर्दी अुडालेली आहे. टाअिपरायटरच्या टंकाघाताचे आवाज, निरनिराळ्या 'साहेबां'च्या टेबलावरून अुठणारे 'हांकघंटेचे' कर्कश गजर, पट्टेवाल्यांच्या तोंडांतून निघणारे 'साऽऽब' असे दीर्घ पडसाद, ऑफिसच्या या टेबलावरून त्या टेबलाकडे संदर्भासाठीं धांवपळ करणाऱ्या दुय्यम दर्जाच्या कारकुनांची धडपड अित्यादि सॉलिसिटरच्या ऑफिसांत केव्हांही आढळून येणाऱ्या गोष्टींनीं तें वातावरण गजबजून गेलें होतें. कारकून मंडळीमध्यें मॅनेजिंग क्लार्क श्री. भगवंतराव भांडूप, लीगल क्लार्क श्री. मार्तंडराव मुलुंद, टायपिस्ट अंबरनाथ, बिलक्लार्क भिकोबा भाअिंदर अित्यादि पूर्वपरिचयाचे चेहेरे दिसत आहेत.

**भांडूप :** ( घंटा वाजवीत ) धोंडी-धोंडी-( धोंडी 'साब'ची साद देत धांवत येतो. ) किती वेळां घंटा वाजवायची? शुद्धीवर आहेस का पिअून आला आहेस? ही फाअील थोरल्या शेटकडे नेअून दे. ( धोंडी फाअील घेअून जातो. ) मिस्टर मुलुंद, तुमचे ते वांद्रा केसचे कागद अद्यापि तयार झाले नाहींत—अन् गांधी व्हर्सेस पटेलचे कागद काल अकरा वाजतां तयार व्हायला पाहिजे होते—

**मुकुंद** : ( बसल्या जागेवरूनच, टेबलावरील कागदाच्या फायलीकडे बोट दाखवून ) हें काय–त्याच कामांत तर मी गुंतलों आहें !

**भांड्रूप** : ( जरा आवाज चढवून ) आठ दिवस तुम्ही तेंच सांगतां आहांत ! हरि–अप्—हरि–अप्–पंधरा वर्षे कामें करतां आहांत तुम्ही–तुम्हांला कामाचा अुरक येणार केव्हां ? तुमचें हें असेंच चालेल तर मला शेटकडे रिपोर्ट करावा लागेल ! धोंडी–( धोंडी–' जी साब ' ) त्या भाअिदरना बोलाव. ( भाअिदर येतो ) लुक हिअर मिस्टर भाअिदर, गेल्या महिन्यांत मीं तुम्हांला वॉर्निंग दिलेली आहे. विल्क्षार्कच्या कामांत असली दिरंगाअी मुळींच चालायची नाहीं. पांच हजार रुपये या महिन्याला वसूल व्हावयाचे राहिले आहेत–काय आहे काय ? फर्मचं दिवाळं वाजवायचा विचार आहे काय तुमचा—

**भाअिदर** : हें पहा सर, म्हणजे काल रात्रीं असं झालं—

**भांड्रूप** : शट अप्, काल रात्रीं तुम्हीं काय केलंत तें मला कशाला सांगतां आहांत ? अन् तुम्हीं शनिवारच्या वसुलींत वीस रुपये कमी दिले आहेत. ते तुम्हीं खाल्ले असं कां समजूं नये आम्ही ?

**भाअिदर** : हें पहा साहेब, शनिवारीं मला अुपास असतो. त्या दिवशीं मी पैसेच काय पण कांहीं खात नसतों—

**भांड्रूप** : गेट अवे–डोन्ट टॉक !

**भाअिदर** : (पुटपुटत) आलीया भोगासी असावें सादर ! ( जातां जातां झाववास ) कालच्यापेक्षां आज जास्त चढलेली दिसते !

**भांड्रूप** : काय म्हणालांत ?

**भाअिदर** : आपल्याला नाहीं–त्यांना बोललों—

[ अितक्यांत अंबरनाथ टंकित केलेले बरेच कागद घेअून येतो व भांड्रूपच्या टेबलावर ठेवतो. भांड्रूप त्याच्याकडे न पहातां कागद बारकाअीनें तपासूं लागतो.

**अंबरनाथ** : ( खालच्या आवाजांत ) आज संध्याकाळची आमची पार्टी लक्ष्यांत आहे ना ? ( भांड्रूप नुसता हुंकार देतो. ) कालचं पत्र भाअीलाल शेटला अद्यापि पोहोंचलेलं दिसत नाहीं !

**भांड्रूप** : ( हलक्या आवाजांत ) हृ—हूं—

[ मुकुंद अेक फाअील घेअून येतो व भांड्रूपच्या शेजारीं मोकळ्या असलेल्या एका खुर्चीवर येअून बसतो.

**अंबरनाथ :** ( मुलुंदला ) पत्रं केलींत ना कालचीं तीं पोस्ट ?

**मुलुंद :** या हातानं ! बारा वाजतांच त्यांना पोहोंचलीं असलीं पाहिजेत.

**भांडूप :** श—शू ! अक्कल आहे कीं नाहीं तुम्हाला ! ( अंबरनाथला ) यू गो. [ मुलुंदला ] कसले कागद आणलेत हे ?

**मुलुंद :** ( त्याच्या मांडीला बाजूनें चिमटा काढीत ) हें बघ अे, तुझी मॅनेजिंग क्लार्कगिरी आतां बंद कर. काल त्या पोरीचा चेहरा पाहिल्यापासून दुसरं कांहीं सुचत असेल तर शपथ ! अन् तूं ओरडतो आहेस, हें काम पुरें कर अन् तें पुरें कर ! शक्य आहे काय ?

**भांडूप :** काल ती कोल्हापुरी वहाण गालफडांत बसायची पाळी आली होती, तरी अजून अक्कल आली नाहीं वाटतं—

**मुलुंद :** छे—छे, तिच्या त्या रागावण्यांत देखील काय बहार होती !

**भांडूप :** तूं घाण केलीस—नाहीं तर ती अितकी बिथरली नसती ! म्हणे माझ्या घरीं या—रोज संध्याकाळीं पांच ते आठ मी एकटा असतों ! ही अक्कल तुझी ! अशा पोरी मिळत असतात होय ?

**मुलुंद :** मग तूं कशाला आपल्या घरीं या म्हणून तिला बोलावीत होतास ? तुझा संसार अन् घरांतला पोरवडा दाखवण्यासाठीं ?

**भांडूप :** हें बघ, मी कांहीं तुझ्या पंथांतला नाहीं; पण एवढं मात्र खरं कीं मनांत आणलं तर आमच्यासारखीं कुटुंबवत्सल व संसारी माणसं असलीं कामं सफाईनें करूं शकतील !

[ अितक्यांत भाअीलाल हातांत कांहीं पत्रें घेअून आपल्या खोलींतून बाहेर येतो. तो आपल्या बाजूस येतो आहे असें पहातांच भांडूप अेकदम चर्या बदलून मुलुंदशीं गंभीरपणें चर्चा करीत आहे असें दाखवितो.

**भांडूप :** ( समोरील कांहीं कागदावर मूठ आपटीत ) ही मायनरची प्रापर्टी आहे असं माझं पहिल्यापासून म्हणणं आहे. शिवाय तें अवॉर्डही लीगल नाहीं. नामदेव व्हर्सेस तुकाराम या केसप्रमाणें ही इस्टेट धोंडूबाअीला मिळावयालाच पाहिजे !

**भाअीलाल :** मिस्टर भांडूप—

**भांडूप** ( अेकदम अदबीनें उभा राहून ) यस् सर—( मुलुंदला ) यू कॅन गो—मात्र तुम्ही ती मद्रास रिपोर्टमधील चन्नप्पा व्हर्सेस तम्मण्णा बघून ठेवा !

**भाअीलाल :** मिस्टर मुलुंद, थांबा. तुम्हीही पाहिजेत जरा. हें पहा, मिस्टर भांडूप, आज सकाळीं हीं दोनतीन पत्रं माझ्याकडे आलीं आहेत. सही नाहीं त्यावर कोणाची—तुम्हांला ठाअूक आहे कीं मी निनांवीं पत्रांचा कधींच विचार करीत नाहीं—पण त्यामध्यें तुम्हां दोघांच्या नांवाचा अुल्लेख केलेला आहे—

**दोघे :** काय आमच्या ?

**भाअीलाल :** होय, या पत्रांतील कांहीं प्रकार काल संध्याकाळीं तुमच्यासमोर घडलेला आहे असं म्हटलेलं आहे—तुम्हीच वाचा हें—

[ भांडूप व मुलुंद गंभीर चेहरे करून तीं पत्रं वाचतात. अितक्यांत पेस्तनजी आपल्या खोलींतून हातांत पत्रें घेअून प्रवेश करतो.

**पेस्तनजी :** आय ज्यो, भाअीलाल, आ बधी शी धमाल छे ? साला कअि—कअित्री लिवते अे लोक !

[ भाअीलाल त्याच्या हातून तीं पत्रें घेतो व वाचतो.

**भाअीलाल :** ओ, द सेम स्टफ अगेन ! डोन्ट वरी—आय् ॲम जस्ट नाव अिन्क्वायरिंग अिन्टु द सेम अफेर—

**पेस्तनजी :** नो टाअीम टु पीप अिन्टु सच रॉटन थिंग्ज् !

[ जातो.

**भाअीलाल :** बोला, काय म्हणणं आहे तुमचं ?

**भांडूप :** म्हणायची कांहीं सोयच राहिली नाहीं मुळीं !

**मुलुंद :** आपण खुद्द कल्याणलाच विचारलं असतं म्हणजे बरं !

**भाअीलाल :** नाहीं—खऱ्याखोट्याची खात्री केल्याशिवाय त्याला विचारणं बरं नाहीं ! मला त्याच्याबद्दल फार आदर आहे ! विनाकारण त्याच्या भावना दुखवण्यांत काय अर्थ आहे ? मीं मुद्दामच त्याला आतां बाहेर पाठविला आहे !

**भांडूप :** खरं सांगूं साहेब, आपल्यासारख्यांनीं या असल्या गोष्टींत फार लक्ष्य घालूं नये हें सर्वांत अुत्तम !

**मुलुंद :** शिवाय किती केलं तरी कल्याण आपला मनुष्य आहे ! लोक काय वाटेल तें लिहितील !

**भाअीलाल :** नो—नो—धिस् अिज व्हेरी सीरीयस अफेअर ! पत्रांत कल्याणविरुद्ध केलेले आरोप खोटे असतील तर अुत्तमच. पण जर ते खरे असतील तर त्यांच्याकडे

दुर्लक्ष्य करून चालणार नाहीं ! माझ्या फर्मच्याच नव्हे तर माझ्या फॅमिलीच्या रेप्युटेशनचा प्रश्न आहे हा !

**भांडूप :** पाहिलंत मुकुंद ! आम्ही काय सांगत होतों ? या गोष्टी फार दिवस गुप्त रहाणं कधीं शक्य नाहीं ! नाहीं, मी म्हणतों, माणसांनीं करावं–पण त्याला कांहीं सुमार–विवेक–कंट्रोल ?

**मुकुंद :** तें बाकीचं सारं अेक वेळ क्षम्य आहे–पण जिथं अन्न खायचं तिथंच विष्ठा टाकायची–छे–छे–छे !

**भांडूप :** साहेब, आपण आम्हांला या संकटांत घालूं नका–आपण आमचे अन्नदाते—

**मुकुंद :** आणि कल्याण आमचा मित्र ! खरं सांगावं तर मित्रद्रोह होतो—

**भांडूप :** आणि खोटं सांगावं तर स्वामीद्रोह होतो. भारतीय युद्धांत अर्जुनाला देखील हाच प्रश्न पडला होता !

**भाअीलाल :** डू यूअर ड्यूटी–दॅटस् ऑल ! सत्यापुढें जगांत कोणाचीही परवा करूं नये. कल्याणला पिण्याचं व्यसन असेल अशी मला कल्पना नव्हती !

**भांडूप :** खरं सांगायचं म्हणजे काल संध्याकाळपर्यंत आम्हाला देखील त्याची कल्पना नव्हती ! आतां कल्याण आपल्या अिथं अितकीं वर्षं आहे. पण एक दिवस कधीं त्याचं वर्तन आपल्याला वाअीट दिसलं नाहीं—नाहीं, उगाच अेकाद्याविरुद्ध खोटं कशाला बोला !

**मुकुंद :** बाकी आजपर्यंत त्याच्या घरीं असे आम्ही कधींच गेलों नव्हतों ! कालच त्याच्या घरांत पहिल्यांदा पाऊल टाकलं !

**भांडूप :** त्याचं असं झालं, काल हा परीक्षा पास झाला; फार आनंद झाला आम्हांला ! सालिसिटरची परीक्षा पास होणं म्हणजे कांहीं सामान्य गोष्ट आहे ? ऑफिसच्या कामाच्या गर्दीत त्याच्याशीं काल बोलायला देखील वेळ झाला नाहीं–संध्याकाळीं ठाकुरद्वारच्या रामाच्या देवळांत यांची सहज गांठ पडली—

**मुकुंद :** रोज संध्याकाळीं रामाच्या देवळांत आमची गांठ पडली नाहीं असं कधीं होत नाहीं !

**भांडूप :** तेव्हां बोलतां बोलतां साहजिकच कल्याणचा विषय निघाला ! म्हटलं अुभ्या अुभ्या त्याच्या घरीं जाऊन त्याचं अभिनंदन तरी करून येअूं या. मनुष्याच्या आयुष्यांत असे प्रसंग वारंवार थोडेच येतात ? म्हणून आम्ही त्याच्या

विन्हाडीं गेलों. बाहेरचं दार अुघडणार, अितक्यांत आंतून खूप हंशा आणि आरडाओरडा बाहेर अैकूं आला !

**मुकुंद :** आणि वासाचा तर असा भयंकर भपकारा आला—कीं त्याच पावलीं परत मागं फिरावं असं वाटलं !

**भाअीलाल :** मग, पुढं ?

**भांडूप :** अितक्यांत कल्याणनं आम्हांला आंतून पाहिलं—कसं कोणास ठाअूक ? त्याबरोबर त्यांनीं हात धरून आम्हां दोघांना आंत नेअून सगळ्यांच्या मध्ये बसविलं—आंतला देखावा काय वर्णन करायचा ? वेताळाचा दरबारच तो !

**मुकुंद :** आणि त्यांत सामील होण्यासाठीं आमच्यावर आग्रहाचा असा कांहीं जबरदस्त मारा झाला कीं आमच्या अैवजीं जर दुसरं कोणी असतं तिथं तर त्यांची कांहीं धडगत लागली नसती !

**भांडूप :** ब्रह्मदेव आला म्हणून आपण थोडेच बघतों आहोंत ! पहिल्यापासून मुळीं आपल्याला या गोष्टीचा अतिशय तिटकारा ! बाकी साहेब—आपण जर आम्हांला त्या परिस्थितींत तिथं पाहिलं असतं तर आपली आमच्याबद्दल भयंकर समजूत झाली असती !

**भाअीलाल :** पण त्यानं लोक तरी कोण कोण जमविले होते अेवढे ?

**भांडूप :** आतां कशाला विचारतां नांवं त्यांचीं साहेब ! चांगले यांच्या आमच्यासारखे प्रतिष्ठित सभ्य लोक होते अेवढं सांगितलं म्हणजे बस् ! दिवसा जर आपण त्यांना पाहिलेंत तर तोंडांत बोटं घालाल !

**मुकुंद :** बाकी साहेब, कल्याणला आम्हीं तिथं प्रत्यक्ष पितांना असा पाहिलाच नाहीं ! आम्हाला बघून लाजला किंवा काय कोणाला ठाअूक !

**भाअीलाल :** या पत्रांत लिहिलेल्या बऱ्याचशा गोष्टी जमल्या म्हणायच्या ! आतां मुख्य महत्त्वाची गोष्ट म्हणजे माझी भाची तिथं होती किंवा काय ?

**भांडूप :** खरं सांगायचं म्हणजे आम्हीं आपल्या भाचीला ओळखत नाहीं साहेब ! आम्ही आपल्या घरीं कधीं चार दोन वेळां वर्षांतून येत असलों तरी आपल्या घरांतील बायका मंडळींचे चेहरे आम्ही कसे ओळखूं शकणार ?

**मुकुंद :** शिवाय त्या बाअींचा चेहराही आम्हांला नीटसा पहायला मिळाला नाहीं. आम्ही आलों तशा त्या घाअीघाअीनें बाजूच्या एका खोलींत गेल्या—

**भांडूप :** आणि कल्याणनं आमच्या देखत त्या खोलीला कुलुप लावलं ! तें

बघून मात्र आम्हीं दोघांनीं खालीं माना घातल्या–म्हटलं–आतां मात्र हा माणूस कामांतून गेला—

**मुकुंद :** आपली भाची जर प्रत्यक्ष पहायला मिळेल तर मी तिला खास ओळखूं शकेन! पण तें कसं जुळणार?

**भाओीलाल :** कसं म्हणजे? मी आत्ताच्चे आत्तां तिला अिथं बोलावून आणतों. मला आतां या प्रकरणाचा छडा शेवटपर्यंत लावलाच पाहिजे! रोज संध्याकाळीं ही कार्टी घरांतून बाहेर जाते–माझी खात्री आहे आतां, या दोघांच्या नेहमीं गांठीभेटी होत असल्या पाहिजेत! कल्याण अितका बदमाष असेल याची मला कल्पना नव्हती. या दोघांची ओळख कशी झाली हेंच मला कळत नाहीं! मी आतां तिला टेलिफोन करतों. कल्याण आला म्हणजे आंत पाठवून द्या!

[ जातो.

**मुकुंद :** द्या टाळी, काल रात्रीं ती पोरगी आपल्याला नीटशी पहायला मिळाली नव्हती–आतां मिळणार कीं नाहीं?

**भांडूप :** कमाल आहे तुझी! बाकी आपल्याला कल्याणचं आश्चर्य वाटतं! अितका चांगला माणूस बाहेरून वाटतो–पण छे, हल्लींच्या काळीं अेकाद्याचा भरंवसा धरायची कांहीं सोय नाहीं! (कल्याण येतो; तसा स्वर व चेहरा बदलून) कलकत्ता हायकोर्टांत जस्टिस शेपर्ड यांनीं हा निकाल दिला आहे, आलं ध्यानांत? कल्याण, भाओीलालशेट तुम्हांला आंत बोलावत आहेत!

[ कल्याण न बोलतां भाओीलालच्या ऑफिसांत जातो.

**मुकुंद :** काय होओील असं वाटतं?

**भांडूप :** ‘ बेट ’ लावशील तर सांगतों!

**मुकुंद :** आपल्याजवळ आज पैसे नाहींत! खालीं पांच रुपये आहेत!

**भांडूप :** पंचवीस रुपयाखालीं आपण खेळत नाहीं!

[ कांहीं वेळानें भाओीलालच्या खोलींतून कल्याण पुढें व भाओीलाल मागें असे दोघे येतात. कल्याणच्या हातात पत्रें असून त्याचा चेहरा क्षुब्ध झालेला आहे.

**कल्याण :** यांतील अक्षर न् अक्षर खोटं आहे. तुम्ही पाहिजे तर यांनाच विचारा! आपलं मत माझ्याविषयीं कलुषित करण्याचा कोणा तरी हलकट माणसाचा हा दुष्ट डाव आहे.

**भाअीलाल :** माझी खात्री झाली म्हणूनच मी तुला विचारतों. मला अितरांना विचारण्याची जरूरी नाहीं ! काल संध्याकाळीं तुझ्या घरांत अेक बाअी होती ही गोष्ट खरी आहे कीं नाहीं ?

**कल्याण :** मी त्याविषयीं कांहीं अेक बोलूं शकत नाहीं !

**भाअीलाल :** आतांपर्यंत तूं माझ्याशीं अशी भाषा कधींही केली नाहींस ! कल्याण, सर्वकाळ सर्वांना फसविणें कोणालाही शक्य नाहीं ! शेवटीं सत्य बाहेर आल्याशिवाय रहात नाहीं !

**कल्याण :** मीं तुम्हांलाच काय—पण कोणालाही आतांपर्यंत कधीं फसविलं नाहीं ! मीं अेका मित्राला वचनानं बांधला गेलों आहे म्हणून मला आपल्या प्रश्नाचं अुत्तर देतां येत नाहीं !

**भाअीलाल :** माझा नोकर म्हणून मी तुला विचारत नाहीं ! आजपर्यंत मी माझ्या मुलाप्रमाणें तुला मानीत आलों—वाटेल त्या सवलती तुला दिल्या—डिपॉझिटचे पांच हजार रुपये देखील मीं तुझ्याकडून घेतले नाहींत ! माझ्या शब्दापेक्षां तुला तुझ्या मित्राच्या वचनाची किंमत जास्त वाटते ?

**कल्याण :** असंच तुम्ही म्हणत असाल तर मीं अेवढें सांगतों कीं काल संध्याकाळीं माझ्याकडे अेक स्त्री आली होती—

**भाअीलाल :** अस्सं, नाअू यू कम् राअुंड !

**कल्याण :** पण तिचा माझा कांहीं संबंध नाहीं !

**भाअीलाल :** तें परमेश्वराला माहीत ! काय नांव तिचं ?

**कल्याण :** तें मला विचारूं नका ! यापेक्षां जास्त मला माझ्या मित्राच्या रहस्याचा स्फोट करतां येत नाहीं !

**भाअीलाल :** मग मी तुला सांगतों कीं ती माझी भाची होती म्हणून !

**कल्याण :** तुमची भाची ? शक्य नाहीं ! मी वाटेल त्याची शपथ घेअून सांगतों कीं ती आपली भाची नव्हती ! तुम्हांला भाची आहे हें मला आतां या क्षणापर्यंत ठाअूक नव्हतं ! माझ्या त्या मित्राची आणि तुमच्या भाचीची ओळख असणें मुळीं शक्यच नाहीं !

**भाअीलाल :** बस कर तुझा तो मित्र ! मित्राच्या नांवाचं पांघरूण घालून स्वतःचं पाप लपत नसतं !

**कल्याण :** म्हणजे मी अितकं जीव तोडून सांगतों तरी आपला माझ्यावर विश्वास नाहीं !

**भाअीलाल :** दारूबाज माणसावर कोण विश्वास ठेवील ? तूं या व्यसनाच्या तडाक्यांत अितका सांपडला असशील याची तरी आजपर्यंत मला कुठं कल्पना होती ?

**कल्याण :** म्हणजे, तुम्ही त्या निनांवी चिठोऱ्यांतल्या वाटेल त्या घाणेरड्या शब्दावर आतां विश्वास ठेवूं लागलांत ! मी दारूबाज आहें असं तुम्हांला म्हणवतं तरी कसं ! तुम्हीं पाहिजे तर यांना विचारा—बोला भांडूप, मुळुंद, तुम्हींच सांगा—दारूच्या अेका थेंबाला तरी मीं कधीं स्पर्श केला आहे का ?

**भांडूप :** आमच्या देखत तर कधींच नाहीं !

**मुळुंद :** तें आपण वाटेल त्याची शपथ घेऊन सांगतों—

**भाअीलाल :** मग आतां उघडच सांगतों कीं काल रात्रीं तुझ्या घरांत झालेल्या साऱ्या प्रकाराचं वर्णन यांनींच आतां मला सांगितलं आहे—

**कल्याण :** कुणी यांनीं—यांनीं !

**भाअीलाल :** हो—हो—यांनीं ! आतां कां बोबडी वळली ! सांगा भांडूप, काल संध्याकाळीं याच्या घरांत दारूबाज वेताळांचा दरबार कसा भरला होता तें फिरून अेकदां सांगा व याची बत्तिशी याच्याच घशांत घाला—

**कल्याण :** माझी बत्तिशी घशांत जाण्यापूर्वीं यांना आपल्या जिभा सव्वाहात बाहेर काढाव्या लागतील ! बोला भांडूप, बोला मुळंद, बोला—म्हणजे माझ्या पैशांनीं माझ्या घरांत प्यालेले माझे दोस्त आपल्या दगलबाजीचें प्रदर्शन कसं करतात हें तरी मला दिसून येअील !

**मुळुंद :** म्हणजे, आम्ही तुमच्या घरीं येअून काल प्यालों असा तुम्ही खुशाल आमच्यावर आरोप करतां आहांत कीं ? बघा साहेब !

**भांडूप :** जाअूं दे रे ! कशाला त्याच्या तोंडीं लागतो आहेस ! मनुष्याचं बिंग अेकदां बाहेर आलं म्हणजे तो वाटेल त्या विरुद्ध वाटेल तें भकत सुटतो ! हें पहा कल्याण, काल आम्हीं दोघेच काय पण ऑफिसांतली सारी मंडळी येअून आपल्या घरीं आपल्या खर्चानें प्यालों ! कबूल—अगदीं कबूल ! झालं तुमचं समाधान ? साहेब, कल्याण म्हणतात तें अगदीं खरं आहे !

**मुळुंद :** आमच्यावर आज यानं वाटेल ते आरोप केले ! अुद्यां साहेबांवर देखील हा वाटेल तो आरोप करावयाचा !

**भाअीलाल :** कल्याण तुमच्या अंतःकरणाची मजल अितकी जाअील याची मला कल्पना नव्हती ! स्वतःच्या संरक्षणासाठीं तुम्ही यांच्यासारख्या सभ्य माणसांवर

वाटेल ते निंद्य आरोप करतां–तुम्हांला शरम कशी वाटत नाहीं ! मी यांना तुमच्या-पेक्षां जास्त ओळखतों !

**कल्याण :** भ्रम आहे तुमचा ! तुम्ही यांनाच काय पण तुमच्या ऑफिसांतील अेकाही माणसाला ओळखत नाहीं ! आत्मसंरक्षणासाठीं मी बोलत नाहीं ! पण कृतज्ञताबुद्धीनें आपल्या हितासाठीं म्हणून मीं सांगतों कीं, आपलं हें ऑफिस व्यसनी बदमाषांनीं बुजबुजलं आहे ! या क्षणापर्यंत मला देखील यांच्या संभावित पाजीपणाची कल्पना नव्हती !

**मुकुंद :** तर–तर–आम्ही बदमाष आणि पाजी ! आणि तूं तेवढा तुकारामाचा बाप–या ऑफिसच्या अुद्धारासाठीं अिथं अवतीर्ण झाला आहेस !

**भांडूप :** आमचं दोघांचं राहूं द्या म्हणा ! आम्हीं अेक बदमाष असूं, पण आमचे झावबा सामंत किंवा आमचे भिकोबा भाअिंदर–( झावबा सामंत व भिकोबा भाअिंदर येतात. ) यांच्या पायाचं तीर्थ घ्यावं रोज सकाळीं–अशी अेकअेक हीं माणसं–यांना व्यसनी बदमाष असं म्हणायची कोणाची छाती आहे ?

**मुकुंद :** अैकलंत, तुम्हीं दोघे दारूबाज आहांत असं कल्याण म्हणतो !

**झावबा :**
**भाअिंदर :** } कोण–आम्ही ?

**मुकुंद :** हो–हो–तुम्हीं ! किंवा आपण सारेच म्हणाना !

[ ते सारे मोठ्यानें हंसतात.

**भांडूप :** काल संध्याकाळीं तुम्हीं सारे लोक याच्या घरीं जाअून गटारांत पडेपर्यंत प्यालांत ! खरं आहे कीं नाहीं हें ?

**झावबा :** आपल्या घरीं काल तर सत्यनारायण होता ! आपण घरांतून गेलोंच नाहीं मुळीं बाहेर !

**भाअिंदर :** मी काल ' नामाचा महिमा ' पहायला गेलों होतों ! आपल्या गळ्यांत माळ आहे ! आपण कधीं खोटं बोलत नाहीं !

**भाअीलाल :** हे–हे सांगतील तें सारं खोटं, अन् तूं तेवढा सच्चा ! सत्याचा आणि सद्गुणाचा अवतार !

**कल्याण :** साहेब, यांच्या बदमाषगिरीचं वर्णन करायला मराठी भाषेंत नवीन विशेषणं निर्माण करावीं लागतील ! सत्यनारायणाची विटंबना करणाऱ्या या घेरड्यावर आणि पंढरीच्या माळेची बदनामी करणाऱ्या या बोक्यावर तुम्ही विश्वास ठेवूं नका !

**भार्अिदर :** अरे वा रे वा ! माझ्या माळेवर म्हणे विश्वास टेवू नका ! मग काय तुझ्या गळ्यांत अडकवलेल्या त्या चिंधीवर विश्वास टेवा होय ?

**मुकुंद :** तरी बरं ! काल पोलीस घरांत शिरले ही भानगड अद्यापि शेटजींच्या कानावर गेली नाहीं !

**भाअीलाल :** म्हणजे-काय म्हणतां काय तुम्हीं ! कल्याणच्या अेकेक भानगडी अैकतां अैकतां मला वेड लागायची पाळी आली आहे !

[ अितक्यांत पेस्तनजीच्या खोलींतून खुद्द पेस्तनजी, रावसाहेब अंबादास व वासंती हीं येतात.

**पेस्तनजी :** धीस् अिज मिस्टर—हू !

**अंबादास :** नो मिस्टर—रावसाहेब अंबादास !

**पेस्तनजी :** तुम्हांला मिलायला आलेत ! कल्याणच्या यांना कांहीं अिन्फॉर्मेशन पायजे !

[ जातो.

**भाअीलाल :** ( बाकीच्या कारकुनांना ) यू गो टू युवर वर्क !

**अंबादास :** यस्, आय् अॅम् रावसाहेब अंबादास ! कोल्हापूर्से ! धीस् अीज माय् पुतणी, अॅन्ड आय् अॅम् हर काका ! आपल्याला अिंग्रजी कळतं ना ?

**भाअीलाल :** आपण मराटींतच बोला !

**अंबादास :** ऑल राइट् ! कल्याणही अिथं आहेतच ! आपल्या ऑफिसांत हे अितके वर्षं नोकर आहेत. आतां सॉलिसिटरही का काय झाले आहेत असं म्हणतात—मला यांच्या वर्तनाबद्दल किंवा अितर पुष्कळ गोष्टींबद्दल आपल्याकडून कांहीं प्रायव्हेट माहिती पाहिजे आहे !

**भाअीलाल :** कशासाटीं आपल्याला ही माहिती पाहिजे ?

**अंबादास :** कशासाटीं ! म्हणजे त्यांचं असं आहे, कीं या आमच्या पुतणीच्या डोक्यांत शिरलं आहे वेड ! तुमच्या—आमच्या काळीं ही कांहीं प्रेमाविमाची भानगड नव्हती ! पण आतां जिथंतिथं हेंच अैकू येतं आहे ! वास्तविक या माणसाला ही मुलगी देण्याच्या मी फार विरुद्ध आहें ! आतां आपलं मन कलुषित करण्याची कांहीं माझी अिच्छा नाहीं—पण माझं कांहीं या गृहस्थाबद्दल चांगलं मत नाहीं !

**भाअीलाल :** मग आपली त्यांत कांहीं अेक चूक होत नाहीं ! आतांपर्यंत माझं याच्याबद्दल अतिशय चांगलं मत होतं, पण—

**कल्याण :** साहेब, मी तुमच्या पायां पडतों–तुम्ही माझ्या सर्वस्वाचा नाश करतां आहांत !

**भाअीलाल :** म्हणजे, तुझ्याविषयीं मला आतां अितक्या गोष्टी माहीत असतां केवळ तुझ्या समाधानासाठीं खोटं सांगून मी या निर्दोष मुलीच्या आयुष्याचा नाश करूं अन् नरकाचा वांटेकरी होअूं म्हणतोस ?

**अंबादास :** ( वासंतीस ) पहा–पहा अैकलंस !

**वासंती :** साहेब, तुमची कांहीं तरी चूक होत आहे ! दुसऱ्या कोणाच्या सांगण्यावरून यांच्याविषयीं तुमचा गैरसमज झाला आहे !

**भाअीलाल :** नाहीं ! मुली, मी विनाकारण गैरसमज करून घेणारा माणूस नाहीं ! यानं आजपर्यंत माझ्यासारख्या हुशार माणसाच्या डोळ्यांत धूळ टाकली ! तिथं तुझ्यासारख्या अजाण मुलीचा काय पाड ? मुली, तुझी माझी कांहीं ओळख नाहीं, पण तूं माझ्या मुलीसारखी आहेस, म्हणून तुला सांगतों !

**वासंती :** आमचं दोघांचं अेकमेकांवर प्रेम आहे ! कल्याणवर माझं प्रेम आहे आणि कल्याणचं–

[ कांता अेकदम धाअीधाअीनें येते.

**कांता :** कल्याणचं माझ्यावर प्रेम आहे–

[ सारे तिच्याकडे वळून पहातात.

**अंबादास :** हीच–हीच कालची मलकाजान !

**भाअीलाल :** कोण मलकाजान ? ही माझी भाची सरोज !

**अंबादास :** राहूं द्या–मी कोल्हापूरचा आहें ! असा बनायचा नाहीं ! हिचं नांव मलकाजान आहे ! हिनं आपल्या तोंडानं मला सांगितलं आहे !

**भाअीलाल :** तुमची हिची कुठं गांठ पडली ?

**अंबादास :** कुठं म्हणजे ? याच्या घरांत ! काल संध्याकाळीं यानं हिला खोलींत कोंडून ठेवली होती ! मीं माझ्या हातानं त्या खोलीचं कुलूप अुघडलं आणि हिला बाहेर काढली !

**भाअीलाल :** बदमाष, आतां बसलं का तुझ्या तोंडाला कुलूप ! प्रत्यक्षः तुझ्या अन्नदात्याशीं असा नीच द्रोह केलास ! कोणत्या नरकांत जाशील ?

**कल्याण :** ही तुमची भाची ! शक्य नाहीं तें ! हिचं नांव सरोज नाहीं–कांता आहे !

**कांता :** मला सरोजही म्हणतात, आणि कांताही म्हणतात !

**अंबादास :** पण खरं नांव आहे मलकाजान !

**भाअीलाल :** कार्टे, तूं या माणसाच्या नादीं लागून माझ्या तोंडाला आणि आपल्या कुळाला काळोखी लावली आहेस !

**कांता :** आमचं दोघांचं लग्न करायचं आतां नक्की ठरलं आहे !

**भाअीलाल–अंबादास–वासंती :** काय–लग्न ?

**कल्याण :** साफ खोटं आहे ! हिचा माझा कांहीं अेक संबंध नाहीं !

**कांता :** आतां कशाला लाजतां ? केव्हां तरी तें यांना कळणारच !

**कल्याण :** काय वेड लागलंय तुला ?

**कांता :** म्हणजे, चार पानं अेवढं पत्र लिहून पुन्हां मलाच वेड्यांत काढतां काय ?

**कल्याण :** पत्र ! कसलं पत्र ? कुणीं लिहिलं पत्र ?

**कांता :** तुम्हीं !–तुम्हीं ! शुद्धीवर आहांत का ? हें पहा तुमचं पत्र !

[ पत्र पुढें करते.

**भाअीलाल :** ( तें हिसकावून घेतो. ) बरोबर, कल्याणचंच अक्षर हें. कल्याण, बोल, आतां सांपडलास कीं नाहीं मुद्देमालासकट ? हें प्रेमपत्र नसून तुझं मृत्युपत्र आहे !

**वासंती :** ( कल्याणला मिठी मारून ओरडत ) कल्याण—

[ कल्याणला काय बोलावें हेंच कळत नाहीं ! तो स्तंभित होतो. बाकीचे सारे चकित होतात. पडदा पडतो.

# ३

## प्रवेश पहिला

रात्रीची साडेदहा—अकराची वेळ. चौपाटीचें वाळवंट. जिकडे तिकडे अगदीं सामसूम झालेली दिसत आहे. अितक्यांत भांडूप व मुकुंद येतात.

भांडूप : कांहीं सुमार आहे कीं नाहीं तुला? अशा वेळीं हात राखूनच काम केलं पाहिजे. ही अंबरनाथची पार्टी चांगलीच अंगावर येणार सगळ्यांच्या!

मुकुंद : तूं माझा हात कां धरलास? मला लागेल तितकं पिअीन मी! मी राजा आहें माझा—

भांडूप : बस कर—पाय लटपटायला लागले तरी म्हणे राजा! कधीं प्यायला मिळालं होतं कीं नाहीं? बराडी आहेस नुसता!

मुकुंद : शट अप्! जेव्हां तेव्हां मला तूं टाकून बोलतोस! मॅनेजिंग क्लार्क म्हणजे तूं कोण समजतोस स्वतःला? तूं मॅनेजिंग क्लार्क असलास तर मी भाअी-

भाअीलाल सॉलिसीटरचा बाप आहें–मी पेस्तनजी शेटचा काका आहें—

**भांडूप :** मोठ्यानें बोलूं नकोस ! अैकेल कुणी !

**मुकुंद :** अैकलं तर अैकलं ! मी कोणाला भीत नाहीं ! ओरडून सांगतों सगळ्यांना ! मॅनेजिंग क्लार्क म्हणजे नुसता गंडेरीवाला आहे आमच्यापुढं ! ( आंतून 'गंडेऽरी' अशी आरोळी. ) बघ, सत्य आहे ! अे गंडेरी—

**भांडूप :** अे लेका, प्याल्यानंतर कुणी गंडेरी खातो होय ?

**मुकुंद :** तूं बोलूं नकोस–मी गंडेरी खाईन नाहींतर फालुदा पिअीन !

[ तोंच सँटाक्रूझ व गोलपिटा येतात. तेही चांगलेच टेर झालेले आहेत.

**गोलपिटा :** अे, शट अप्, डोन्ट शाअूट, काय म्हणतील शमदे लोक ?

**सँटाक्रूझ :** लाअिट माय फॅग ( गोलपिटा त्याची सिगारेट पेटविण्याचा निष्फळ प्रयत्न करतो, शेवटीं कशीतरी पेटवितो ) डू यू नो हू आय्‌ अॅम् ! आय् अॅम् शहाजहान ! मैं शहाजहान हूं–और तूं मेरी मुमताज—

**मुकुंद :** मुमताज, कुठं आहे मुमताज !

**सँटाक्रूझ :** आय् बिल्ट ताजमहाल, डू यू नो !

**गोलपिटा :** ताजमहाल हॉटेल ?

**सँटाक्रूझ :** नो–नो–दॅट् आग्रा ताजमहाल ! आय् बिल्ट अिट् !

**मुकुंद :** अे गोलपिटा, मला थोडीशी व्हिस्की आणून दे रे ! म्हणजे याचा ताजमहाल मी विकतच घेऊन टाकतों.

**सँटाक्रूझ :** ऑल राअिट, गिव्ह मी टू पेग्ज ऑफ व्हिस्की, आय् उअिल सेल माय् ताजमहाल टू यू !

[ मोठ्यानें हसतो. झावबा धडपडत येतो.

**झावबा :** अे लेकहो, अिथं काय करतां आहांत ? तिकडे भाअींदरनें कोण आणली आहे झकास ! खूप मजा आहे–चला—

[ सारे धडपडत जातात. थोड्या वेळानें अंबरनाथ मार्ग वळून पहात पहात येतो. त्याला कोणीतरी दिसतें. तसा तो टाळी वाजवून शीळ वाजवतो. मग कांता लगबगीनें येते.

**कांता :** कोण–मिस्टर पै ?

**अंबरनाथ :** होय, मीच तो. आज संध्याकाळीं आला नाहींत तुम्ही—

**कांता :** नाहीं आलें—पण—पण अितक्या रात्रीं तुम्हीं मला कां टेलिफोन केलांत? किती धाडसी आहांत? शेटजींना कळलं असतं म्हणजे मग!

**अंबरनाथ :** नाहीं कळलं ना? मग झालं तर! मी कशाला बोलावतों आहें? कल्याणनं तिकडे जीव पाखडला आहे तुमच्यासाठीं!

**कांता :** त्याचं तोंड पहायची इच्छा नाहीं मला! बदमाष आहे तो! पत्र लिहूनच्या लिहून मलाच खोटं ठरवतो!

**अंबरनाथ :** हें बघा कांताबेन, कल्याणची कांहीं अेक चूक नाहीं त्यांत! तुम्ही खुशाल साऱ्या लोकांपुढें जर तें पत्र दाखवायला लागलांत, तर त्यानं काय करावं? शेटजीपुढं साऱ्या गोष्टी अुघडपणें कबूल करण्याची कल्याणचीच काय, पण कोणाची छाती झाली असती? तुम्हींच सगळी घाण केलींत. अहो, या गोष्टी दमादमानंच घ्यायच्या असतात!

**कांता :** म्हणजे, कल्याणचं माझ्यावर खरंच प्रेम आहे म्हणतां?

**अंबरनाथ :** प्रेम आहे म्हणून काय विचारतां? तुम्ही प्रत्यक्षच येअून पहा म्हणजे झालं. चार तास झाले, माझ्या खोलींत तडफडतो आहे तो तुमच्यासाठीं—

**कांता :** मग ती मुलगी कोण? तिच्याशीं त्याचं लग्न ठरलं होतं ना!

**अंबरनाथ :** ठरलं होतं, पण केव्हां? तुम्हांला बघण्यापूर्वी! सारं त्यानं तुम्हांला पत्रांत लिहून कळविलं आहे. आतां कां त्याच्या प्रेमाची विनाकारण शंका घेतां? तुमच्यासाठीं त्यानें नोकरी गमावली—त्या पोरीवर पाणी सोडलें—तरी तुम्हांला त्याची परवा वाटत नाहीं! तुमच्यासाठीं काय वाटेल तो स्वार्थत्याग करायची त्याची तयारी आहे—

**कांता :** किती मूर्ख आहे मी! चला, आतांचे आतां मला त्यांच्याकडे घेअून चला—

**अंबरनाथ :** टॅक्सी तयार आहे. तुम्हींच यायला अुशीर केलांत! नाहीं तर या वेळीं आपण तेथें असतों—

[ दोघे जातात. कांहीं वेळानें भाअिंदर, मुकुंद, सँटाक्रूझ, गोलपिठा, झावबा व सुरंगी नांवाची अेक छचेल वेश्या इतकी मंडळी प्रवेश करतात. सुरंगी सर्वांच्यामध्यें आहे. तिच्याभोंवती ते सारे लघळपणा करतात.

भाअिंदर : तुजविण मैना, जीव दिवाणा !

सुरंगी : पुरे करा हा प्रेम बहाणा !

मुळुंद : मी तर बाजी, तूं मस्तानी !

भाअिंदर : मी मज्नुन, तूं लैलाराणी !

मुळुंद : गा माझे चिमणी—

भाअिंदर : मंजुळवाणी !

मुळुंद : हासव गालगुलाब साजणी !

सारे चल ये, पाज शराब !

[ सारे सुरंगीभोंवतीं मोठमोठ्यानें ओरडून गाअूं लागतात. अितक्यांत भांडूप धांवत येतो.

भांडूप : पळा—पोलीस आले !

मुळुंद : कोण पोलीस !

भांडूप : गद्धया, तूं तरी चल, बाकीचे मरूं देत !

[ मुळुंदचा हात धरून त्याला फरफटत ओढून नेतो. अितक्यांत दुसऱ्या बाजूनें चार पोलीस येतात.

पोलीस : पकडा यांना ! दारू पिअून दंगा करताहेत लेकाचे ! ही कोण ? ही त्या पिंजऱ्यांतली साळुंकी अिथं अुडून कशी आली ?

भाअिंदर : ती माझी लैला आहे—

पोलीस : अरे वा मज्नू ? किती झोकलीत आज !

झावबा : साहेब, मी म्हातारा आहें—

पोलीस : चांगला म्हातारा आहेस ! चल हो पुढें, नाहीं तर घालतां कमरेंत लाथ !

[ पोलीस साऱ्यांना घेअून निघून जातात. थोड्या वेळानें वासंती अेकटी येते.

वासंती :

भिववीत जीवा ही निराशा, ने सुखनाशा,
जीवनीं न आशा, हे जगदीशा !

तुटला सुखाचा जणुं शुक्रतारा,
तम घोर व्यापी नभाला, ही भयवेला !

[ वासंती समुद्राच्या बाजूला अंधारांत निघून जाते. थोड्या वेळानें भाअीलाल येतो व अेकदम थांबतो आणि वासंती ज्या दिशेनें गेली त्या दिशेकडे अंधारांत बघूं लागतो.

**भाअीलाल :** वेडी तर नाहीं ही ? अितक्या रात्रीं ही समुद्राकडे कशाला गेली ? जीव तर द्यायचा हिचा विचार नसेल ना ! ( अितक्यांत अुडी मारल्याचा आवाज व अेक किंकाळी अैकूं येते; तसा भाअीलाल अेकदम दूरच्या लोकांना अुद्देशून ओरडतो ! ) धांवा, धांवा, अेका बाअीनें समुद्रांत अुडी मारली अिकडे !

[ भाअीलाल अंधारांत धांवत धांवत जातो.

## प्रवेश दुसरा

[ समुद्रकिनाऱ्याकडील अेक रस्ता. भांडूप, मुळुंद व बाळाराम बोलत येतात.

**भांडूप :** अस्सं–अस्सं–हेच ते बाळाराम काय ? पण ह्यांचा आणि कल्याणचा संबंध कसा काय आला ?

**बाळाराम :** ते रहातात त्याच्या मागल्या बाजूला जी रंगाऱ्याची चाळ आहे तिथें मी रहातों.

**मुळुंद :** असं काय करतां भांडूप ? अहो, म्हणजे परवाचे दिवशीं रात्रीं कल्याणनें अेक बाअी आणून आपल्या घरांत दडवून ठेवली होती—

**भांडूप :** बरं–बरं–बरं—

**मुळुंद :** नंतर पोलीस तिथं आले अन् खूप भानगड झाली—

**भांडूप :** म्हणजे मलाच सांगतोस काय फिरून तें ? सगळ्या गांवाला माहीत आहे तें !

**मुळुंद :** ती बाअी म्हणजे यांचं कुटुंब—

**भांडूप :** अरे, अरे, आपलं कुटुंब ना त्या ? काय हलकट माणूस असला पाहिजे कल्याण ! दुसऱ्याच्या सुखाच्या संसारांत विष कालविणाऱ्या माणसाला खरोखर फांसावर चढवायला पाहिजे ! आपली ओळख झाली–फार आनंद झाला !

**मुलुंद :** दुपारीं कल्याणचा शोध काढीत काढीत हे ऑफिसांत आले आणि पुष्कळसं कांहीं सांगूं लागले—म्हटलं तसं कशाला, संध्याकाळीं आपण बाहेरच भेटूं अन् काय करायचं तें ठरवूं!

**भांडूप :** तुम्हांला आमच्याकडून काय पाहिजे असेल ती मदत मागा! पैसे पाहिजे असतील तर पैसे, प्यायला पाहिजे असेल तर प्यायला—

**मुलुंद :** कायदेशीर सल्ला पाहिजे असेल तर सल्ला! संकटांत सांपडलेल्या माणसाला साहाय्य करणं हें आमचं कर्तव्य आहे. मी तुम्हांला सांगूं? हा सारा फाजीलपणा त्या कल्याणचा आहे. तुमचं कुटुंब फार सज्जन आहे—मला ठाऊक आहे—

**वाळाराम :** तुम्हांला काय ठाऊक?

**मुलुंद :** नाहीं, म्हणजे मीं आपलं अैकलं आहे. चांगल्या माणसाची कीर्ति का कुठं लपून रहाते?

**भांडूप :** बरं, पण, त्या दिवशीं तुम्हीं अेवढा खटाटोप केलांत, पोलीस आणलेत—पण अितकं करून शेवटीं काय झालं?

**वाळाराम :** अहो, कसचं काय न् कसचं काय? गरिबाला मुळीं न्यायच मिळत नाहीं जगांत! पोलिसांनीं त्याला लागलेंच सोडून दिलें—

**भांडूप :** देणारच! ते मार्ग फार निराळे आहेत—

**वाळाराम :** अन् अुलट मलाच त्यांनीं दम भरला. खबरदार म्हणाले असल्या खोट्या तक्रारी पुन्हां आणाल तर—

**मुलुंद :** पण तुमच्या बायकोचं काय झालं!

**वाळाराम :** ती निघून जी पसार झाली ती थेट परेलला कोणा ओळखीच्या बाअीकडे जाअून राहिलेली आहे. दोन दिवस झाले—परतच येत नाहीं!

**मुलुंद :** घरीं अेकटे का आतां?

**वाळाराम :** मग काय तर!

**भांडूप :** मी सांगतों तुम्हांला—तुमची बायको आतां परत येत नाहीं—

**वाळाराम :** तें कां?

**भांडूप :** आपलं मी सांगतों तें अैका झालं! ती आतां तुमच्याकडे परत येणं शक्य नाहीं!

**बाळाराम :** कशी परत येत नाहीं तें पहातों ! ती नाहीं तिचा बाप परत येअील !

**मुकुंद :** तिचा बाप परत येअून तुम्हांला काय फायदा ? फार चूक केलीत तुम्हीं बाळाराम ! म्हणजे बायको परी बायको गेली अन् अब्रू परी अब्रू गेली ! जगांत तुमचं निव्वळ हंसू झालं !

**भांडूप :** परेळला तुमची बायको कोणा अेका ओळखीच्या बाअीकडे जाअून राहिली आहे असें तुम्ही म्हणतां. पण तेथें जाअून तुम्हीं प्रत्यक्ष पाहिलं आहे काय ?

**बाळाराम :** छेः, मला काय अेवढी जरूरी पडली आहे ? मरेना ती ! कुणी तरी सांगितलं झालं !

**भांडूप :** मी तुम्हांला सांगतों, कीं तुमची माहिती सपशेल चुकीची आहे. तुमच्या डोळ्यांत निव्वळ कोणी तरी धूळ टाकली आहे. तुम्हांला सांगूं तुमची बायको कुठं आहे तें ?

**बाळाराम :** कुठं ?

**भांडूप :** तुम्ही विश्वास ठेवा अगर न ठेवा, प्रत्यक्ष पाहिलें तें सांगतों. आज सकाळीं तुमची बायको या डोळ्यांनीं मीं कल्याणच्या घरीं पाहिली. खोटं बोलत असेन तर जीभ झडून पडेल !

**बाळाराम :** काय, कल्याणच्या घरांत ? शक्य नाहीं ! पुन्हां त्याच्या घरांत कशी जाअील ती ?

**भांडूप :** कां, तुमच्या बापाची भीति आहे काय तिला ? परवां तिथं पोलीस घेअून गेलांत आणि हलवून खुंटा बळकट केलांत ! आतां ती तुमच्या नाकावर टिच्चून जाअील तिथं—समजलांत !

**मुकुंद :** त्या दोघांना पक्कं ठाअूक आहे कीं, तुमच्या हातून कांहीं होणं शक्य नाहीं ! त्या दिवशींच त्यांनीं तुमचं पाणी ओळखलं ! करणारीं माणसं असतात तीं कांहीं निराळींच असतात !

**बाळाराम :** मग याला आतां अुपाय ?

**भांडूप :** कांहीं अुपाय नाहीं याला ! बायकोच्या नांवानं चौपाटीवर जाअून शंख करीत बसा दोन्हीं हातांनीं, दुसरं काय ?

**मुकुंद :** मी म्हणतों, बायको जायची ती गेली, पण चार पैसे कमवायची संधी आली होती चालून ती देखील अजागळासारखी दवडलीत !

**बाळाराम :** तेवढ्याचसाठीं तर ऑफिसांत आलों होतों आज–

**भांडूप :** या, अगदीं वेळेवर आलांत कीं नाहीं! नोकरी गेली त्याची! आतां दमडी मिळायची नाहीं तुम्हांला त्याच्या हातून!

**बाळाराम :** मग मीं आतां काय करावं असं तुमचं म्हणणं आहे?

**भांडूप :** हे चार आणे घ्या अन् बांगड्या भरून या, चांगल्या कोपरापर्यंत! नवऱ्यासारखे नवरे असून वर आम्हांलाच विचारतां काय करूं ते! सोन्यासारखी बायको, आपली खुशाल अुठून दुसऱ्याच्या घरीं जाअून राहते–आणि तुम्ही अिथं स्वस्थ बसून डोकं खाजवीत विचारतां, काय करूं म्हणून! शरम नाहीं वाटत तुम्हांला? आमची बायको नाहीं आम्हांला सोडून जात? अन् तुमचीच कशी जाते!

**बाळाराम :** या प्रश्नाला अुत्तर नाहीं. गेली आहे खरी. कशी म्हणून काय सांगूं?

**भांडूप :** काय विशाद आहे? बायको म्हणजे कुठल्या झाडाचा पाला! आमच्या घरांत असं कांहीं झालं असतं तर चामडी सोलून तिच्या हातांत दिली असती!

**बाळाराम :** आतां जर ती मला भेटेल तर जीव घेअीन मी तिचा!

**मुकुंद :** बस करा कीं! कशाला अुगीच तोंडाची वाफ दवडतां? जीव घ्यायचा म्हणजे पाव छटाक घ्यायची नाहीं तिथं जाअून!

**भांडूप :** आणि तिचा जीव घेअून आतां फायदा काय? बायकांची अब्रू गेल्यानंतर त्या मेल्या काय अन् जिवंत काय सारख्याच! जीव घ्यायची हिंमत असेल तर त्याचा घेअून दाखवा!

**बाळाराम :** मला आणखी अेक पाअूणशेर पाजा! मग बघा. कल्याणचाच काय–पण तुम्हीं सांगाल त्याचा जीव घेअून दाखवितों. तुम्हीं कोण समजतां मला? जो माझी अब्रू घेअील–त्याचा जीव घेअीन मी!

**मुकुंद :** हं पहा, आतां पिणं बंद! तुम्हीं काय म्हणतां तें करून दाखवा आधीं–मग तुम्हांला आठ दिवस बेवड्याच्या पिंपांत सीलबंद करून ठेवतों!

**बाळाराम :** कल्याणचं मला भय दाखवतां? तो दिसूं द्या तर अिथं! निकाल लावून टाकीन त्याचा! माझं कोण काय करणार आहे?

**भांडूप :** बरोबर बोललांत! तुमचं कोण काय करणार! बेशक करून टाका म्हणालांत तें! आम्हीं आहोंत ना तुमच्या मागं.

**मुळुंद :** आणि झालंच तसं कांहीं तर जास्तींत जास्त काय होणार ? फांशी नाहीं तर काळं पाणी ! नाहीं, मी म्हणतों, यापेक्षां जास्ती तें काय होणार ? स्वतःच्या अब्रूपुढं प्राणाची काय किंमत आहे ?

**भांडूप :** ( खिशांतून अेक अिंग्रजी वृत्तपत्र काढीत ) हें पाहिलंत 'टाअिम्स'मध्यें वातमी आली आहे आज छापून ! अेका पठाणाच्या बायकोकडे कोणी तरी वांकड्या नजरेनं पाहिलं तर त्या पठाणानं त्या माणसाचा डोळा फोडला ! याला म्हणतात स्वाभिमान ! नाहीं तर तुम्ही ! तुमची बायको धडधडीत कल्याणच्या खोलींत सांपडली–किती तास तिथं होती कुणास ठाअूक ? तरी तुम्हीं आपले अजून स्वस्थ ! कांहीं झालं तरी पठाण ते पठाणच ! तुमच्यासारखे नादान नवरे आपल्या हिंदु समाजांत आहेत म्हणूनच आमचा समाज अशा अधोगतीला येअून पोहोंचला आहे.

**बाळाराम :** मी पठाणाचा बाप आहें. येअूं द्या कल्याणला अिथं !

**भांडूप :** तुम्हांला कदाचित् अशी काळजी वाटत असेल कीं, आपण यदाकदाचित् तुरुंगांत गेलों किंवा फांशी गेलों तर आपल्या मागं आपल्या बायकोची काळजी कोण घेअील ? असंच ना ? हीच जर तुम्हांला चिंता असेल तर आतां मी तुम्हांला वचन देतों. तिची सारी व्यवस्था मी लावीन. तुम्ही अगदीं निर्धास्त असा त्या बाबतींत. आमच्या घरांत अितकी मंडळी आहेत, त्याच्यांत अेक माणूस कांहीं जास्ती नाहीं.

**मुळुंद :** तुझ्या घरांत पुष्कळ मंडळी आहेत, पण माझ्या घरांत तर अेक सुद्धां माणूस नाहीं ! सडा फटिंग मी ! तेव्हां यांच्या बायकोला माझ्या घरांत ठेवायला मला तर कांहीं जड जाणार नाहीं ना ? हें पहा बाळाराम, बायकोसाठीं आशा ठेवूं नका मागं. तिची अुत्तम व्यवस्था लावतों आम्हीं !

**भांडूप :** ( अेकदम दूर पहात ) जरा थांबा. अरेच्च्या, म्हणजे कल्याणच हा ! ( बाळारामास ) भाग्यवान् आहांत तुम्ही बुवा ! तुमचा बळी आपण होअून तुमच्याकडे चालत आला कीं ! आतां बोललांत तें करून दाखवा झटपट ! मुळुंद, तुम्हीं याला घेअून बाजूला जा ! मी कल्याणला अिथंच थोपवून धरतों. तुम्ही मागून अेकदम या म्हणजे झालं ! बाळाराम, अशी संधी यायची नाहीं पुन्हां ! आम्ही आमच्यासाठीं सांगत नाहीं–पण तुमच्या बायकोच्या अब्रूसाठीं !

**बाळाराम :** तुम्ही बोलूं नका–लंवे करतों त्याला—

[ मुलुंद वाळारामाच्या दंडाला धरून बाजूला नेतो. अितक्यांत दुसऱ्या बाजूनें कल्याण येतो.

**भांडूप :** कसे नेमके भेटलांत कल्याण ! मी तुम्हांलाच हुडकत होतों. फार वाअीट झालं बुवा अेकंदरींत—

**कल्याण :** जाअूं द्या, कशाला अुगाच जिवाला लावून घेतां आहांत ? तुमच्या मनासारखं झालं—आतां आरामशीर झोंप घ्या घरीं जाअून !

**भांडूप :** काय, बोलतां काय हें कल्याण ! मग तुम्हांला आमचं अंतःकरणच कळलं नाहीं अजून ! आम्हीं तुमचं अन्न खाल्लं आहे—अेक वेळ तुम्हीं आम्हांला डांबीस म्हणा पण कृतघ्न म्हणूं नका ! तुमच्यासारख्या दोस्तावर संकट आलं असतां आम्हीं आरामशीर झोंप घेअूं काय ? मीं शेटजींना त्याच वेळीं त्यांच्या तोंडावर सांगितलं कीं, हें तुम्हीं खराब केलंत ? कल्याणसारख्या माणसाला तुम्हीं आयुष्यांतून अुठवलंत—तुमचं कधीं चांगलं होणार नाहीं. आमचं रक्त कांहीं आम्हांला स्वस्थ बसून देतं आहे ? थाडदिशीं आपण सांगून टाकलं ! मग तुम्हांला काय म्हणायचं तें म्हणा !

**कल्याण :** तुमच्या म्हणण्यावर माझा आतां विश्वास बसेल असं तुम्हांला वाटतं ?

**भांडूप :** बसो किंवा न बसो ! आतां आम्हांला आमचं जें कर्तव्य आहे तें केलंच पाहिजे. आजपर्यंत तुम्हांला आम्ही अनेक वेळां सांगत आलों कीं, कल्याण, हें चुकतंय् बरं ! अितक्या अुघडपणें तुम्हीं वागतांय् हें कांहीं बरं नाहीं—काय करायचं असेल तें आपलं चोरून करा !

**कल्याण :** अहो, पण मी करीत होतों काय ?

**भांडूप :** तें निराळं. तुम्ही करा किंवा न करा ! पण जें कांहीं करायचं तें चोरून करीत जावं, हा आमचा अुपदेश होता. प्रामाणिक अुघडपणानं वागणाऱ्यांची ही दुनिया नाहीं ! ढोंगी लबाडांचं जग आहे हें ! अगदीं पहिल्यापासून आम्ही तुमच्या हें कानींकपाळीं ओरडतों आहोंत—पण तुमचा आमच्यावर कधीं विश्वास नसेल तर शपथ !

**कल्याण :** हें पहा, यापुढं कोणत्याही मित्रावर विश्वास टेवायचा नाहीं असं मीं ठरवलं आहे.

**भांडूप :** टाळी द्या. मग हेंच तर मी तुम्हांला सांगत होतों. जगांत शहाण्या माणसानं कोणाचा देखील भरंवसा धरूं नये. अगदीं जिवश्च कंटश्च मित्रांचा सुद्धां !

अहो, कसचे आले आहेत मित्र ! तुमचे दोस्त म्हणून मिरविणारे हे लोक तुमच्या पैशानं तुमच्या बरोबर खातील, पितील, मजा करतील, आणि वेळ आली म्हणजे मात्र तुमचा गळा कापायला मागंपुढं पहाणार नाहींत ! मी सांगतों ना तुम्हांला तुम्हीं आमच्यासुद्धां भरंवसा धरूं नका—

[ अितक्यांत मागून बाळाराम येतो व कल्याणवर सुरीनें हल्ला करतो.

**कल्याण :** ( व्याकळून ) आः-मेलों—

**भांडूप :** खून-खून-खून-पोलीस-धांवा-पकडा—

**बाळाराम :** माझी बायको पळवतो-जीव घेईन मी—

**भांडूप :** मुकुंद, बघतां काय ? पोलीस घेअून या.

**कल्याण :** ( बाळारामाला पकडून ) बदमाष, बेसावधपणें हल्ला करतोस-जीवच घतों तुझा !

[ त्याला खालीं पाडतो व मारूं लागतो, तों भांडूप त्याला अडवतो.

**भांडूप :** हं-हं-कल्याण काय हें ! मागं सरा. मी धरतों त्याला. पाहिलंत, मी होतों म्हणून वाचलांत तुम्हीं—

[ कल्याण अुठून मागें सरतो तों त्या बाजूनें कौशिक येअून त्याचा गळा पकडतो.

**कौशिक :** सांपडलास कीं नाहीं आतां ?

**कल्याण :** कोण कौशिक ! गद्धया, तुझा कट आहे कीं काय हा ? चल-हो बाजूला !

[ त्याला ढकलून देतो.

**कौशिक :** अितका बदमाष असशील याची कल्पना नव्हती मला ! कांताला माझ्यापासून हिरावून न्यायला शरम वाटली नाहीं तुला ?

[ पुन्हां त्याच्या अंगावर धांवतो. भांडूप बाळारामाला सोडून त्याला अडवतो. तसा बाळाराम मागल्या मागें पसार होतो.

**भांडूप :** अहो-अहो, काय हें ! कल्याण, तुम्ही अिथं आतां थांबूं नका ! अिथें मारेकऱ्यांचं पेव फुटलेलं दिसतं आहे ! अधिक वेळ थांबाल तर जीव गमावाल—

**कल्याण :** मागं सरा-( कौशिकचा गळा पकडून ) निमकहराम, तुझ्यावर अुपकार केले त्याची ही फेड होय ? तुझ्यासाठीं त्या पोरीला मीं माझ्या घरांत

आश्रय दिला, आणि माझ्या आयुष्याचा सत्यानाश करून घेतला. नोकरी गमावली, प्रेमाची होळी केली, त्याची जाणीव आहे तुला ! अुलट तूं माझ्याशीं हरामखोरी केलीस ! ती भाअीलालची भाची आहे हें माझ्यापासून चोरून ठेवलंस आणि मला माझ्या मालकांशीं बेअिमान ठरविलंस ! बदमाष, माझ्याशीं विश्वासघात करून फिरून मलाच कृतघ्न म्हणतोस ?

[ त्याला गदगदा हलवून ढकलून देतो.

**भांडूप :** अरे, थांबा–थांबा–काय–हें—

[ मुकुंद व दोन पोलीस येतात.

**१ पोलीस :** हाच काय तो माणूस ?

**भांडूप :** हा नाहीं–तो पळाला अितक्यांत त्या बाजूनं; जलदी करा तर सांपडेल ! छेः, छेः, आज अिथं अगदीं खूनच पडला असता–मी होतों म्हणून हे वांचले—

**२ पोलीस :** पाहूं, लागलं का तुम्हांला ? ( कल्याणची पाठ तपाशीत ) अरे, चांगलीच जखम झाली आहे–अन् तुम्हीं स्वस्थ अुभे काय ? मराचंय काय तुम्हांला ? चला, आतांचे आतां तुम्हांला अिस्पितळांत नेलं पाहिजे–

**भांडूप :** मुकुंद, बघतां काय टॅक्सी बोलवा—

[ मुकुंद जातो.

**कौशिक :** माफ कर कल्याण, पण मीं तिच्या हातांत तुझ्या अक्षराचं पत्र पाहिलं—

**कल्याण :** बस कर. बदमाष आहांत तुम्हीं सारे दोस्त लोक. सारा जन्म जरी तुमच्यावर अुपकाराचे डोंगर रचले तरी तुमच्या स्वार्थाचा प्रश्न आला कीं तुमची बुद्धि नादान होते आणि तुमच्या पाजी कृतघ्नपणाची मजल वाटेल त्या थरापर्यंत जाअूं शकते ! तुझं तोंड पहाण्याची माझी अिच्छा नाहीं—

**पोलीस :** आली टॅक्सी. चला, बोलतां काय–मोठी जखम आहे ही—

**कल्याण :** त्या पळून गेलेल्या माणसानं केलेल्या जखमेपेक्षां या दोस्तांनीं काळजांत केलेली जखम फारच भयंकर आहे. चला.—

[ कल्याण व पोलीस जातात.

**कौशिक :** कल्याण, मी येतों थांब—

**भांडूप :** ( त्याला अडवून ) हें पहा–हा माझा पत्ता. मला अुद्यां सकाळीं

यअून भेटा. मी कल्याणचा दोस्त आहें. तुमची काय भानगड असेल ती बेशक येअून मला सांगा. आपल्या तोंडून अवाक्षर निघायचं नाहीं—

[ कौशिक त्याचें कार्ड फेंकून देतो व कल्याण ज्या दिशेनें गेला तिकडे धांवत जातो.

**भांडूप :** ( डोकें खाजवीत ) या लेकाच्याची काय भानगड आहे ?

## प्रवेश तिसरा

भाअीलाल सॉलिसीटरचा गांवदेवीवरील बंगला. दुसऱ्या मजल्यावरील अेक शृंगारलेलें बैठकदालन. दुसऱ्या दिवशीं सकाळीं नअू साडेनअू वाजायची वेळ. गळ्याला गरम मफलर गुंडाळून व अंगांत लोकरी 'स्वेटर' घालून वासंती कोचावर पडलेली आहे. शेजारच्या खुर्चीवर रा. सा. अंबादास बसून तिच्याशीं बोलत आहेत.

**अंबादास :** आतां बरं वाटतंय ना तुला ?

**वासंती :** अगदीं बरं वाटतंय ! तसं मला झालंय काय ?

**अंबादास :** झालंय काय ? डोकं फिरलंय तुझं डोकं ! म्हणे मला झालंय काय ? आपलं हृदय दुसऱ्याला देअून टाकल्यानंतर डोकं शाबूत रहाणार कसं ? शरीरांतल्या सर्व गोष्टी जिथल्या तिथं पाहिजेत, तर सगळं गाडं सुरळीत चालतं ! डोकं ताळ्यावर असलेलं माणूस मध्यरात्रीं समुद्रावर जाअील कशाला मरायला ?

**वासंती :** कशाला म्हणजे मरायला ! सांगितलं नाहीं का तुम्हांला मघाशीं !

**अंबादास :** चूप, मरणाबिरणाची भाषा तोंडांतून काढलेली मला नाहीं खपायची ! तुम्हीं अलीकडची तरुण मंडळी जगायला अगदीं नालायक आहांत ! परीक्षा नापास झाली खा अफूचा गोळा, नोकरी मिळाली नाहीं काप वस्तऱ्यानं गळा, बापाशीं भांडण झालं पळ देशोधडीं, प्रेमभंग झाला तर मार समुद्रांत अुडी—काय रे हें ? मग जन्माला तरी कशाला येताय लेकहो ! मी हायकोर्ट प्लीडरची परीक्षा पंधरा वेळां नापास झालों म्हणून प्रत्येक वेळां जीव द्यायला रंकाळ्याच्या तलावाकडे धांवत सुटलों नाहीं ! लग्न मोडलं तर मोडलें ! त्याबद्दल जीव द्यायचं काय कारण ? माझं लग्न देखील चार वेळां मोडलं ! अेकदां तर अितकं झालं कीं लग्नाच्या मांडवांतून अैन घटकेला मुलगी वधूपक्षांतील मंडळींनीं

नापत्ता केली ! मुंडावळी बांधून चार तास बोहोल्यावर मी मुलीची वाट पहात विड्या फुंकीत अुभा होतों ! म्हणून जीव देण्याचे नादान विचार कधींही डोक्यांत आले नाहींत आपल्या—

**वासंती :** तें निराळं आणि हें निराळं—

**अंबादास :** कांहीं निराळं नाहीं ! सगळे प्रकार मुळांत अेकच ! संसारांत माणसानं धीर सोडतां कामा नये, ही गुरुकिल्ली आहे सगळी ! अुपासनीबाबांनीं आम्हांला हा कानमंत्र देअून ठेवला आहे ! आतां काल रात्रींचीच गोष्ट घे. अेक वाजतां भाअीलाल शेट मला घेअून जायला सरदारगृहांत आले—म्हणाले चला—विचारलं कुठं—तर म्हणाले चला आधीं, विचारूं नका ! माझ्या डोक्यांत काय भलभलत्या कल्पना आल्या असतील याची कल्पना आहे तुला ? मन चिंती ते वैरी न चिंती ! दोन्ही हातांत काळीज धरून मी अिथं आलों. माझ्या जागीं दुसरा कोणी असता तर नुसत्या भयाच्या हवक्यानंच तिथल्या तिथं थंड झाला असता ! सांगायचं काय, तर माणसाला दम पाहिजे !

**वासंती :** दम लागला तुम्हांला. किती बोलतां आहांत मघांपासून ! शिवाय रात्रभर झोंपही नाहीं तुम्हांला ! थोडी विश्रांति तरी घ्या.

**अंबादास :** विश्रांति ! आतां कोल्हापूरला गेल्याशिवाय विश्रांति नाहीं. दोन दिवसांत सारे दशावतार पाहिले या मुंबअींतले ! आतां अिथं अेक क्षणभर देखील रहायची आपली अिच्छा नाहीं ! अन् तुलाही पण राहूं देणार नाहीं ! दुपारच्या मेलनं आज कोल्हापूरला कूच ! आतां थोडा वेळ आहे—तेव्हां म्हटलं बाजारांतून जाअून यावं. पोरांना फुगे न् खेळणीं घेअून यायचीं आहेत—तिला गंगावन आणायचं आहे आणि मला त्या पॉवेल कंपनींत जाअून पट्टा घेअून यायचा आहे.

[ अितक्यांत भाअीलाल येतो.

**भाअीलाल :** काय रावसाहेब, आलां बाहेर जाअून ?

**अंबादास :** नाहीं, आतां जाअून येतों जेवायच्या वेळेपर्यंत. काय, लागला पत्ता !

**भाअीलाल :** छे हो, कुठं कार्टी बेपत्ता झाली आहे कोणास ठाअूक ? आज सकाळीं मला कळलं ! रात्रीं घरांतल्या मंडळींनीं मला मुळीं कळवलंच नाहीं ! तरी मीं चार पांच पोलीस-स्टेशनवर फोन करून ठेवला आहे—

**वासंती :** ही काय भानगड आहे ?

अंबादास : तुझ्यासारखींच आहे अन् दुसरं काय ? कालची रात्र म्हणजे भयंकर भानगडीची दिसते आहे ! यांची ती भाची कांता, सरोज का मलकाजान, काल रात्रीपासून कुठं बेपत्ता झाली आहे कोणास ठाअूक ? तुझीच बहीण आहे दुसरी ! या कल्याणच्या नादानं किती पोरी आपला नाश करून घेणार आहेत कोणास ठाअूक ? तूं जीव द्यायला समुद्रावर गेलीस तशीच ही पोरगी अेकाद्या डोंगरावर चढून बसली नसली म्हणजे मिळवली !

भाअीलाल : तसली भीति तिच्या बाबतींत तरी मला मुळींच नाहीं. तशी ती पक्की आहे. प्राण गेला तरी जीव द्यायची नाहीं ती ! बेपत्ता होण्याचा तिचा हा कांहीं पहिलाच प्रसंग नाहीं. तिच्या आअीसाठीं म्हणून मला प्रत्येक वेळेला गय करावी लागते. नाहीं तर यापूर्वींच मीं तिचा कधींच निकाल लावून टाकला असता !

अंबादास : कांहीं म्हणा, पोरीच्या पालकांना हल्लीं भारीच वाअीट दिवस आले आहेत ! या तरण्याताठ्या पोरी लग्नावांचून घरांत बाळगायच्या म्हणजे घासलेटच्या चिमण्या अुशाला पेटवून झोपीं जाण्यापैकीं आहे. कधीं या भडकून घरादाराची राखरांगोळी होअील याचा नियम नाहीं !

भाअीलाल : म्हणूनच बालविवाह चांगला असं माझं मत आहे !

अंबादास : टाळी द्या. तुमचं आमचं मत तंतोतंत जुळलं ! लहानपणीं मुलींचं लग्न लागलं, म्हणजे बापाच्या गळ्याभोवतींची तात तरी सैल होते. झालीच पुढं कांहीं भानगड तर ती नवऱ्याच्या नांवावर जमा होते—बापाला तरी त्याचा उपसर्ग नको ! कुणी गाढवानं हा शारदा कायदा काढला आहे कोणास ठाअूक ? त्या सारड्याला चारदोन पोरी पाहिजे होत्या असल्या; म्हणजे कळला असता बालविवाहबंदीचा हिसका !

भाअीलाल : ऑफिसाच्या कामामुळं मला घरांत लक्ष्य घालायला अेवढासुद्धां वेळ मिळत नाहीं, त्यामुळें ही पोरगी काय करते, कुठं जाते, कोणाला भेटते हें मला कळण्याचा मुळींच संभव नाहीं !

अंबादास : तुम्हीं रात्रंदिवस डोळ्यांत तेल घालून पोरीवर पाळत ठेवा ना ! कांहीं अेक अुपयोग व्हायचा नाहीं ! पोरीची जात मांजरासारखी आहे ! दोन्हीं वेळां जेवायच्या वेळीं मान खालीं घालून तुमच्या शेजारीं लडिवाळपणानं गोंडा घोळतील; पण बाकीचा वेळ कुठं चोरपावलांनीं पसार होतील याचा पत्ता लागायचा नाहीं तुम्हांला !

**भाअीलाल :** तुम्हीं काय म्हणतां तें अगदीं अक्षरशः पटलं.

**अंबादास :** तुम्हीं हिला काल वांचवून माझ्यावर अन् माझ्या कुटुंबावर अुपकार केले आहेत याची तुम्हांला कल्पना नाहीं—

**भाअीलाल :** अुपकार कसले यांत ?

**अंबादास :** तुमच्या लक्ष्यांत आलं नाहीं मी काय म्हणतों तें ! बायकांनीं जीव देणं आणि पुरुषानं जीव देणं यांत फार अंतर आहे. हिला काय होतंय जीव द्यायला ? लोकांनीं मला दे माय धरणी ठाय करून सोडलं असतं ! वीसबावीस वर्षांची अविवाहित मुलगी खुशाल अुठून समुद्रांत जीव देते म्हणजे कांहीं सामान्य गोष्ट आहे ? लोकांनीं काय काय तर्क रचले असते याची कल्पना नाहीं तुम्हांला ! जीव देणाऱ्याचा पाय पकडतां येतो, पण बोलणाराची जीभ अडवतां येत नाहीं !

**भाअीलाल :** आमच्या नशिबाला या पोरीनं काय वाढून ठेवलं आहे कोणास ठाअूक ! आतां सांपडली कीं पहिल्या प्रथम तिचं लग्न टोकून टाकणार ! मिळेल त्या माणसाशीं ! आपल्या घरांत ही घोरपड नको—

**अंबादास :** लाख बोललांत–हेंच ठरविलं आहे मीं हिच्या बाबतींत ! कोल्हापूरला गेलों कीं पहिल्या आठवड्यांत हिला अुजवून टाकतों ! समजलं वासंतीबाअी ! परीक्षेचा मंडप यंदा बंद ! लग्नाच्या मंडपांत प्रवेश होणार तुमचा ! बरं तर. आलोंच जाअून मी अितक्यांत. तुम्हीं आहांत ना अिथं !

**भाअीलाल :** मी टेलिफोनच्या अुत्तराची वाट पहात आहें. कांहीं तरी बातमी लागल्याशिवाय मला अिथून हलतांच येत नाहीं !

**अंबादास :** ठीक. मग हिच्यावर नजर ठेवालच. नाहीं तर तेवढ्यांत ही कुठं तरी पसार व्हायची !

**वासंती :** चला, अुगाच काय थट्टा करतां ?

**अंबादास :** नाहीं ग बायांनो, तुमचा कांहीं भरंवसा नाहीं ! तुमच्यावर सारखं लक्ष्य ठेवलं पाहिजे ! बायकांवर नेहमीं नजर ठेवीत जावं असं मला अुपासनीबाबांनीं मागंच सांगून ठेवलेलें आहे !

[ जातो.

**वासंती :** माझ्यासाठीं तुम्हांला किती त्रास पडला ?

भाअीलाल : छे; त्रास कसला ? अुलट, अेका बुद्धिमान् मुलीला प्राणांतिक संकटांतून वांचविण्याचं श्रेय मला मिळालं याबद्दल खरोखर मला अभिमान वाटतो !

वासंती : मला नसतं वांचवलं तर फार बरं झालं असतं !

भाअीलाल : म्हणजे, स्वतःचे प्राण वांचल्याबद्दल तुला आनंद झाला नाहीं ?

वासंती : कसा होअील ? तुम्हांला काय वाटलं कीं मी वेड्याच्या भरांत आत्महत्या करायला गेलें !

भाअीलाल : अर्थात्‌च ! आत्महत्या करणारा प्रत्येक माणूस वेडा असतो असा कायद्याचा सिद्धान्त आहे.

वासंती : वेडा कायदा ! आत्महत्या करणाऱ्या माणसाच्या मनाचा थांग मग कायद्याला अजून लागलाच नाहीं असं म्हणायला पाहिजे. कायद्याच्या समजुतीसाठीं का माणूस जगत असतो ? ज्याच्याकरितां जगायचं तें आयुष्यांतून नाहींसं झाल्यानंतर आत्मघात करणं हें पाप नसून तसंच निर्हेतुकपणें जगणं हेंच खरोखर पाप समजायला पाहिजे !

भाअीलाल : कुणी शिकवलं तुला हें तत्त्वज्ञान ?

वासंती : मृत्यूनं ! अेकच क्षण त्याच्या सान्निध्यांत होतें मी काल रात्रीं ! पण अितक्या वर्षांत आयुष्याचं जें कोडं मला अुमगलं नाहीं तें काल अेका क्षणांत मला सुटल्यासारखं वाटलं. यापूर्वी मरणाचा विचार मला किती तरी भेडसावीत होता. पण आतां त्याच्याबद्दलचं भय मला अजिबात वाटेनासं झालं आहे.

भाअीलाल : पण प्रेमाखातर आत्मघात करायचा ही गोष्ट आमच्या गुजराती मनाला पटत नाहीं. पूर्वीच्या काळीं कांहीं कर्जबाजारी व्यापाऱ्यांनीं अब्रू बचावण्यासाठीं जीव दिल्याची अुदाहरणं आहेत. पण हल्लीं ते लोक देखील शहाणे झाले आहेत ! जीव देण्यापेक्षां दिवाळं काढणं त्यांना सध्यां जास्त परवडतं.

वासंती : प्रेमासाठीं मनुष्य काय करायला तयार होअील हें स्वतः प्रेमपाशांत पडल्याशिवाय कळून यायचं नाहीं ! विचारूं का तुम्हांला ? तुम्हांला अनुभव आहे प्रेमाचा ?

भाअीलाल : छेः, वयाच्या पांचव्या वर्षी माझं लग्न झालं. प्रेमपाशांत पडण्याच्या वयांत मी दोन पोरांचा बाप झालों होतों, त्यामुळें प्रेम करायला मला कधीं सवडच मिळाली नाहीं—

वासंती : मग कल्याणवरील माझ्या प्रेमाची तुम्हांला कल्पना येणं शक्य नाहीं !

**भाअीलाल :** तें कां ? तसं म्हणशील तर माझं स्वतःचं कल्याणवर अतिशय प्रेम आहे–होतं ! पोटच्या पोराप्रमाणें मी आजपर्यंत त्याला मानीत आलों. काल त्याच्या आयुष्याचं रहस्य मला प्रथम कळलं तेव्हां केवढा धक्का बसला असेल बरं माझ्या मनाला ? दक्षिणी माणसावर आधीं आम्ही विश्वास ठेवीत नसतों. अेकदांच ठेवला, तो अितका कीं स्वतःवरही नसेल अेवढा ! त्याचा हा शेवट !

**वासंती :** अितकं कल्याणवर तुमचं प्रेम असून त्यांच्याविरुद्ध ज्या ज्या गोष्टी तुम्हीं अैकल्या किंवा पाहिल्या त्यांवर तुमचाहि तावडतोब विश्वास बसला ?

**भाअीलाल :** विश्वास बसायला फार वेळ लागतो, पण अुडायला अेक क्षणही पुरें होतें ! जाअूं दे. तो विषयच नको.

**वासंती :** शेटजी, काल माझ्यावर तुम्ही एवढा मोठा अुपकार करून ठेवला आहे– फिरून आणखी अेकच अुपकार कराल का ?

**भाअीलाल :** तो कोणता ?

**वासंती :** काका परत येण्यापूर्वीं कल्याणची व माझी भेट होअील असें करा.

**भाअीलाल :** तें शक्य नाहीं ! कल्याणला आतां तूं भेटणं हें मला जसं आवडायचं नाहीं तसं त्यांनाही मुळींच आवडायचं नाहीं. त्यांच्याशीं मला कसा विश्वासघात करतां येअील ?

**वासंती :** कालचा माझा आत्महत्येचा प्रयत्न यशस्वी झाला असता तर त्यांना फिरून भेटण्याचा प्रश्नच अुद्भवला नसता ! तुम्हीं मला माझ्या इच्छेविरुद्ध वागवलंत–तेव्हां माझी अेक अिच्छा तरी तुम्हांला पुरवलीच पाहिजे. आज मी कोल्हापूरला जाणार. कदाचित् आयुष्यांत त्यांची माझी भेटही होणार नाहीं ! म्हणून मी तुम्हांला ही विनंती करतें. शेटजी, कृपा करा. तुमच्या मूर्ख मुलीचा अेवढासुद्धां लळा तुम्ही पुरवणार नाहींत ?

**भाअीलाल :** ( थोडावेळ विचारमग्न होतो. अेकदम आठवल्यासारखें करून ) अरे पण हो, मी तें विसरलोंच होतों. कल्याणची अन् तुझी सध्यां तरी भेट होणं शक्य नाहीं.

**वासंती :** तें कां ?

**भाअीलाल :** तो आतां अिस्पितळांत आहे.

[ वासंती कोचावरून ताडकन् अुठून अुभी रहाते.

**वासंती :** अिस्पितळांत ! काय म्हणतां–माझा कल्याण अिस्पितळांत ! बोला–काय झालं त्याला ?

**भाअीलाल :** काल संध्याकाळीं कोणा तरी माथेफिरू अिसमानं त्याच्यावर जबरदस्त हल्ला करून त्याला जखमी केलं–गोकुळदास तेजपाळ अिस्पितळांत ठेवलं आहे त्याला–साऱ्या वर्तमानपत्रांत छापून आलं आहे—

**वासंती :** मला माहीत नाहीं ! मला कुणी सांगितलं सुद्धां नाहीं–अरे देवा, कसे असतील ते ! कल्याण अिस्पितळांत आणि मी अिथं खुशाल लोळत पडलें आहे ! सांगा–सांगा कसे आहेत ते ? तुम्हीं नाहीं भेटायला गेलांत त्यांना ?

**भाअीलाल :** नाहीं–आतां मी त्यांना भेटायला कसा जाअूं !

**वासंती :** किती दुष्ट आहांत तुम्ही ! अितकीं वर्षें तुमच्या हाताखालीं प्रामाणिकपणें नोकरी केलेला माणूस–तुम्हीं ज्यावर आपल्या मुलाप्रमाणें प्रेम करीत आलांत असा माणूस, प्राणांतिक संकटांत तिकडे पडला असतांना त्याच्या समाचाराला जायची साधी माणुसकी देखील तुमच्यांत नाहीं ! आपुलकीच्या तुटलेल्या संबंधाला अुपेक्षेचं अितकं भीषण स्वरूप येतं ? आत्तांचे आतां मला त्यांना भेटायला गेलंच पाहिजे !

**भाअीलाल :** माझें अैक जरा तूं—

**वासंती :** नाहीं–नाहीं–मी त्यांना भेटणार ! चला, तुम्हींही चला–त्यांना डोळे भरून पाहिल्याशिवाय मला आतां क्षणही चैन पडायचं नाहीं !

**भाअीलाल :** मला तुम्हांला अेथून जाअूं देतां येणार नाहीं !

**वासंती :** नाहीं जाअूं देणार ? मग मी या खिडकींतून अुडी मारून धांवत जाअीन त्यांच्याकडे ! काल मला वांचवलंत आणि आज असा जीव घेतां माझा ? तुम्हांला दया, माया, प्रेम, माणुसकी कांहीं आहे कीं नाहीं ? चला, व्हा बाजूला–

**भाअीलाल :** मग अेक क्षणभर थांब. मी अिस्पितळाच्या अधिकाऱ्याला टेलिफोन करून आधीं विचारतों. मग आपण दोघेही जाअूं !

[ शेजारच्या खोलींत जातो. वासंती अस्वस्थ चित्तानें अेकसारख्या अेरझारा घालते.

येइ घोर अंधकार, बुडवी जीवा,
निशा कळेना आली भीषण कां ?

( भाअीलाल येतो. ) बोला, बघतां काय माझ्याकडे ?

**भाअीलाल :** आनंदाची बातमी आहे तुला ! कल्याण बरा आहे—

**वासंती :** बरे आहेत–खरंच–खरंच बरं आहेत ते—

**भाअीलाल :** आतां अितक्यांतच तो डिसचार्ज होतो आहे.

**वासंती :** बोललांत तुम्हीं त्यांच्याशीं ? पाहिलंत तुम्हीं त्यांना ?

**भाअीलाल :** किती वेडी आहेस ! टेलिफोनवरून पहातां येतं होय ? मीं त्याला अिकडंच सरळ बोलावलं आहे ! पंधरा मिनिटाचे आंत तो अिकडे येअील.

**वासंती :** खरंच–खरंच अिथं येणार ! अहाहा—

> धडधड हृदया, थांबिव अदया,
> धीर धरी, ये दैवतरी, पैलतिरीं !
> वितळली हीं रात्र सारी,
> गोड वाजे रागदारी,
> जीव होई धुंद भारी, सुखद येई उषा !
> चल मार धांव मम राजसा,
> गरुड ना भरारी घे तसा !
> थैमान जीव करि हा कसा !
> थयथय मोरा, नाच चकोरा,
> छुमछुम ये, रुमझुम ये !

ते येणार आणि माझा हा असा अवतार ! अशा पोषाखांत त्यांनीं मला पाहिलं तर काय म्हणतील ते !

[ घाअीघाअीनें आंत जाते. भाअीलाल सचिंत चेहेरा करून अुभा रहातो. अितक्यांत कौशिक येतो. भाअीलाल आहेत असें पहातांच तो अेकदम धांवत येअून त्यांचे पाय धरतो.

**भाअीलाल :** कोण तूं ?

**कौशिक :** मला क्षमेचं अभिवचन द्याल तर मी आपले पाय सोडतों.

**भाअीलाल :** पण मीं तुला जन्मांत कधीं पाहिलं नाहीं ! तुला क्षमा करण्याचं कारण काय मला ?

**कौशिक :** फार मोठा अपराध केला आहे मीं आपला ! आपल्याला मीं सारं सांगितलं तर तोंड पहाणार नाहीं आपण माझं !

**भाअीलाल :** अूठ, भिअू नकोस ! सांग, काय भानगड आहे ?

**कौशिक :** केवळ माझ्या स्वतःकरतां मी दयेची भीक मागायला आलों असें नाहीं. माझ्या अविचारी मूर्खपणामुळं माझ्या अेका निरपराधी मित्राच्या सर्वस्वाचा नाश होण्याची वेळ आली आहे. त्याच्या वतीनं भिकेचा पदर आपल्यापुढं पसरण्यासाठीं मी अिथं आलों आहें !

**भाअीलाल :** कोण हा मित्र ?

**कौशिक :** कल्याण !

**भाअीलाल :** कल्याणची तरफदारी करायला तूं अिथं आला असशील तर याच पावलीं चालता हो ! त्याच्या बाबतींत तुझ्या मध्यस्तीचा कांहीं अेक अुपयोग होणार नाहीं. कल्याणसारख्या व्यसनी, बदफैली आणि बदमाष माणसासाठीं—

**कौशिक :** सबूर करा ! कल्याणबद्दल तुम्हीं वापरलेली ही भाषा तापलेल्या शिशाच्या रसाप्रमाणें माझ्या कानांत जात आहे. नाहीं महाराज, हा केवळ तुमचा गैरसमज आहे. कल्याण व्यसनी नाहीं, बदफैली नाहीं आणि बदमाष तर नाहींच नाहीं ! मित्रासाठीं वाटेल तो स्वार्थत्याग करणारा जर कोणी या जगांत महात्मा असेल तर तो कल्याण !

**भाअीलाल :** कोणती लांच देअून कल्याणनं तुला अिथं पाठविलं आहे ?

**कौशिक :** प्रेमाची, मैत्रीची, आपुलकीची ! यापेक्षां अधिक कोणती लांच तो मला देअूं शकणार ! आम्ही दोघे कॉलेजमध्यें एका वर्गांत होतों. तेव्हांपासून मी त्याला ओळखतों आहे. आजपर्यंत अनेक वेळां त्यांनीं मला मोठमोठ्या अडचणींतून वांचविलं आहे; त्या साऱ्या अुपकारांची फेड मी मात्र त्याचा नाश करून आज करीत आहें.

**भाअीलाल :** त्याच्या नाशाशीं तुझा काय संबंध ?

**कौशिक :** तेंच सांगण्यासाठीं मी आपणाकडे आलों आहें. माझं नांव कौशिक. वलसाडचा रहाणारा मी. अनाहिल देसाअी आहें.

**भाअीलाल :** म्हणजे आमच्या जातीचा—

**कौशिक :** होय. आपण मला ओळखत नाहीं. पण माझे वडील रतनजी देसाई हे आपल्या चांगल्या परिचयाचे होते.

**भाअीलाल :** काय म्हणतोस ? तूं रतनजीचा छोकरा ? रतनजीचा मुलगा अेवढा मोठा असेल अशी मला कल्पना नव्हती ! बरं मग—

**कौशिक :** गेल्या महिन्यांत आपल्या कांताबेनशीं माझी सहज ओळख झाली !

**भाअीलाल :** कोण कांताबेन ?

**कौशिक :** आपली भाची कांताबेन !

**भाअीलाल :** माझी भाची ! तिचं नांव सरोज आहे !–पण हो ! तूं म्हणतोस तीच असेल ती ! ती वाटेल त्याला वाटेल तीं नांवं सांगते !

**कौशिक :** तें मला माहीत नाहीं. ओळखीचं रूपांतर प्रेमांत होअून आम्हीं दोघांनीं लग्न करायचं ठरवलं–आपल्याला आश्चर्य वाटलं असेल ?

**भाअीलाल :** मुळींच नाहीं ! नेहमींचाच खेळ आहे तिचा हा ! तुझ्यासारख्या मूर्ख तरुणांना बनविणं हा तिचा ठराविक अुद्योग आहे.

**कौशिक :** आतां मला तें कळून आलं. पण त्यावेळीं मात्र मला तसें वाटलं नाहीं. मी गरीब असल्यानं आमच्या विवाहाला आपण परवानगी देणार नाहीं असं तिनं सांगितलं; म्हणून आम्हीं दोघांनीं आफ्रिकेला पळून जायचं ठरवलं !

**भाअीलाल :** आफ्रिकेला काय म्हणून ?

**कौशिक :** तिथें मला अेका कंपनींत पांचशें शिलींगांची नोकरी मिळत होती ! आजच्याच बोटीनें आम्हीं निघणार होतों ! मध्यंतरीं तिनं दोन दिवस गुप्तपणें कुठं रहायचं हा आमच्यापुढं प्रश्न आला तेव्हां कल्याणच्या घरीं मीं तिला नेअून ठेवायचं ठरविलं !

**भाअीलाल :** पण कल्याणची अन् तिची तर ओळख होती चांगली !

**कौशिक :** मुळींच नाहीं साहेब. मी आपल्याला वाटेल त्याची शपथ घेअून सांगतों, कल्याणनं तिला प्रथम माझ्याबरोबर पाहिली. ती कोण आहे हें देखील त्याला ठाअूक नव्हतं. ती आपली भाची आहे हें मीं त्याला मुद्दाम सांगितलं नाहीं. नाहीं तर तो तिला आपल्या घरीं अशा परिस्थितींत ठेवून घ्यायला कधींही तयार झाला नसता ! केवळ मला सहाय्य करण्यासाठीं म्हणून कल्याणनं तिला आपल्या घरीं ठेवून घेतलें आणि ही नसती बिलामत आपल्यावर ओढून घेतली !

**भाअीलाल :** अस्सं ? माझी कल्पना निराळी होती ! बरं पण, कल्याणची अन् तिची ओळख नव्हती तर त्यानं तिला तें प्रेमपत्र कसं लिहिलं ? तें तर मीं प्रत्यक्षच डोळ्यांनीं पाहिलं आहे ! तें तर कांहीं खोटं नाहीं ?

**कौशिक :** तें पत्र मीं स्वतः जेव्हां पाहिलं तेव्हां माझा देखील तसाच समज झाला. अेवढंच नव्हे तर माझंही डोकं मत्सरानं भडकून मी कल्याणचा जीव घ्यायला निघालों होतों. पण थोड्या वेळापूर्वी मी अिस्पितळांत त्याला भेटण्याला गेलों असतां तें पत्र आपण लिहिलं नाहीं म्हणून डोळ्यांत अश्रू आणून त्यानं सांगितलं ! तें पत्र कोणी लिहिलं—कां लिहिलं हें त्याला अद्यापिही माहिती नाहीं. तथापि त्या पत्राशीं कल्याणचा कांहीं अेक संबंध नाहीं अशी माझी मनोमन खात्री पटली आहे.

**भाअीलाल :** ही निव्वळ भावनेची फसवणूक आहे ! कल्याणच्या हातचा लेखी पुरावा जोंपर्यंत धडधडीत जिवंत आहे तोंपर्यंत त्यांनीं हे अश्रू गाळण्याचं कितीही सोंग केलं तरी त्यानं कायदेबाज मनुष्य फसला जायचा नाहीं ! कायद्याची दुनिया फार निराळी आहे ! जें मनाला वाटतं तें खरं नसून जें असतं अन् डोळ्यांना दिसतं तेंच खरं, ही कायद्याची दृष्टी असते ! तें पत्र जोंपर्यंत नाशावीत झालं नाहीं तोंपर्यंत कल्याणच्या निरापराधित्वावर माझा केव्हांही विश्वास बसणार नाहीं !

[ अितक्यांत अेक पोलीस अधिकारी, अेक पोलीस शिपाअी व अंबरनाथ अेवढी मंडळी प्रवेश करतात. अंबरनाथचा चेहरा फारच अुतरलेला असून तो पोलिसांच्या अटकेंत आहे असें दिसतें.

**अधिकारी :** गुड मॉर्निंग. मिस्टर भाअीलाल आपणच ना ?

**भाअीलाल :** होय. कां ?

**अधिकारी :** आपल्या ऑफिसांत हा मनुष्य टाअिपरायटर आहे ना ?

**भाअीलाल :** हा टाअिपरायटर कांहीं नाहीं, पण टायपिस्ट आहे आमच्याकडे हा. अंबरनाथ याचं नांव. काय भानगड आहे ?

**अधिकारी :** आणि आपल्या भाचीचं नांव कांताबेन का–सरोजबेन—

**कौशिक :** तिचा काय संबंध ?

**भाअीलाल :** दोन्ही नांवं तिचींच ! पुढें बोला.

**अधिकारी :** या इसमानं त्या मुलीवर काल रात्रीं बळजुबरी करण्याचा प्रयत्न केला म्हणून आम्हीं त्याला अटक केली आहे.

**भाअीलाल :** कोणी–यानं ! अरे हरामखोरा ! अन् ती कार्टी कुठं आहे ?

**अधिकारी :** पोलीस ठाण्यावर आहे. त्यांच्या जबानीचं काम अजून चाललं आहे—

**भाओीलाल :** अितका बदमाष असेल हा याची मला कल्पना नव्हती. म्हणजे आमच्या ऑफिसांत बदमाष कोण अन् साव कोण हें ओळखण्याची सुद्धां आतां पंचाअीत आली !

**अधिकारी :** आली आहे खरी. कारण, काल रात्रीं बाराचे सुमारास तुमच्याच ऑफिसांतल्या चार कारकुनांना चौपाटीवर अेका वेश्येबरोबर दारू पिअून दंगा केल्याच्या आरोपावरून अटक करण्यांत आलेली आहे. आतांच ते जामिनावर सुटले आहेत.

**भाओीलाल :** काय म्हणतां ? अेकाहीपेक्षां अेक भयंकर गोष्टी अैकतों आहें मी कालपासून ! मी जागा आहें, का स्वप्नांत आहें ? कोणत्या गोष्टीवर विश्वास ठेवावा अन् कोणत्यावर टेवूं नये हेंच मला कळेनासं झालं आहे.

**अधिकारी :** ( कांहीं पत्रें भाओीलालच्या हातांत देत ) या अिसमाची झडती घेतली तेव्हां त्याच्या खिशांत हीं पत्रं सांपडलीं आहेत. हें या पत्रांतलं अक्षर कोणाचं हें आपण सांगूं शकाल ?

**भाओीलाल :** ( पत्रें पाहून ) हें कल्याणचं अक्षर आहे. हीं पत्रं तुझ्या खिशांत कशीं आलीं ? का चोरलींस त्याचीं हीं पत्रं ?

**अंबरनाथ :** ( खालीं मान घालून ) कल्याणचीं पत्रं नाहींत तीं–

**भाओीलाल :** मग कोणाचीं–

**अंबरनाथ :** मींच लिहिलीं आहेत तीं !

**कौशिक :** हा पहा जुळला दुवा मघाचा !

**अंबरनाथ :** साहेब, मला क्षमा करा आणि या संकटांतून वांचवा. कल्याण व कांताबेन अेकमेकांवर आषक आहेत अशा समजुतीनं मीं कांताबेनला फसविण्या-साठीं हीं कल्याणच्या अक्षरांत बनावट पत्रं तयार करून तिला पाठविलीं व फसविलं—

**भाओीलाल :** काय भयंकर माणूस आहे हा ! माझी सही करून गेल्या वर्षी पांचशें रुपयांचा चेक कुणी वटविला हें आतां माझ्या लक्ष्यांत आलं ! अेकूण, कल्याणचा या पत्राशीं कांहीं संबंध नाहीं !

**अंबरनाथ :** मुळीच नाहीं ! कल्याण अगदीं निरपराधी आहेत ! त्याच्यावर

निरनिराळ्या तऱ्हेचीं वालटं आणून आपलं मन कलुषित करण्याचा आम्हींच प्रयत्न केला—

**भाअीलाल :** आम्ही ! म्हणजे दुसरे कोण साथीदार आहेत तुझ्या जोडीला ?

**अंबरनाथ :** त्यांचीं नांवं सांगून आणखी पातक कशाला मी करूं ? माझ्या पुरता मी आपला सारा अपराध कबूल करतों—

**कौशिक :** आतां पटली खात्री ! कल्याण सर्वस्वीं निर्दोषी आहे !

**भाअीलाल :** अरे-अरे ! कल्याणच्या विरुद्ध आलेल्या वाटेल त्या खोट्यानाट्या गोष्टींवर विश्वास ठेवून मीं निव्वळ पराचा कावळा रचला ! रागाच्या भरांत मी काय वाटेल तें त्याला बोललों ! ( वासंती येते. ) वासंती, कल्याण निर्दोषी आहे— कल्याण अगदीं निरपराधी आहे !

**वासंती :** पटलं तुम्हांला ?

**भाअीलाल :** अगदीं पूर्णपणें ! फार मोठा अपराध केला आहे मींच कल्याणचा ! आतां कोणत्या तोंडानं मी कल्याणला भेटूं अन् कशी क्षमा मागूं त्याची ?

[ कल्याण येतो. त्याचा अेक हात बँडेजनें गळ्यांत अडकवला आहे.

**कल्याण :** छेः छेः माझी क्षमा तुम्हीं काय म्हणून मागणार ? अुलट माझ्यामुळं तुम्हांला अेवढा मनस्ताप भोगावा लागला म्हणून मीच तुमची क्षमा मागतों !

[ भाअीलालच्या पायां पडतो.

**भाअीलाल :** कल्याण, बेटा, मींच तुझ्या पाया पडावें अशी तुझी योग्यता आहे !

**वासंती :** कसं वाटतं तुम्हांला कल्याण ?

**कल्याण :** अगदीं अुत्तम ! जिवावरच आलं होतं तें नुसत्या हातावर निभावलं !

**कौशिक :** माझा गाढवपणा तुला भोंवला हा !

**कल्याण :** चालायचंच ! जगांत कोणाचा गाढवपणा कोणाला तरी भोंवतोच !

**भाअीलाल :** मला आश्चर्य वाटतं तें हें कीं अेका दिवसांत माझं तुझ्याविषयींचं चांगलं मत अेकदम अितकं कसं बदलूं शकलं !

**कल्याण :** त्याचं कारण सांगूं ? जगांत चांगल्या गोष्टीपेक्षां वाअीट गोष्टीवर लोकांचा चटकन् विश्वास बसतो ! लौकिकबुद्धि खऱ्याखोट्याचा निवाडा करण्याचे मुळींच श्रम घेत नाहीं ! समाजमन हें बहुधा मत्सरी व निंदाप्रिय असतं व आपल्या तरल कल्पनेनं तें अेका क्षणांत पराचा कावळा निर्मूं शकतं !

**भाअीलाल :** बरोबर आहे. बरं—मी यांच्याबरोबर जाअून येतों अितक्यांत. मी येअीपर्यंत तूं हलूं नकोस अिथून !

**कौशिक :** ही पुंगी अिथं असतांना हा नागोबा अिथून हलण्याचं आतां भयच नको ! ( भाअीलालला ) मीही येतों तुमच्याबरोबर.

**भाअीलाल :** तिच्या काकानं तिच्यावर अुत्तम नजर ठेवायला सांगितलं आहे मला—

**कल्याण :** जा तुम्हीं. अुत्तम नजर ठेवतों तिच्यावर मी !

[ भाअीलाल, कौशिक, पोलिस अधिकारी, अंबरनाथ इ. जातात.

**वासंती :** कल्याण, माय किंग—

**कल्याण :** वासंती, माय क्वीन—

**वासंती :** ग्रहण सुटलं !

**कल्याण :** अं हं ! अजून नाहीं ! दान देअून टाक, म्हणजे आतां सुटेल !

**वासंती :** चला, फाजील कुठले—अिस्पितळांतून आलांत तरी अजून वात्रटपणा आहेच का ?

**कल्याण :** तुला कल्पना नाहीं ! अिस्पितळांत रोग्याच्या वात्रटपणाला पुष्कळ व्यायाम मिळतो !

**वासंती :** खरंच, बरं वाटतं तुम्हांला ?

**कल्याण :** तूं समोर असल्यावर मग दुसरं काय वाटणार ?

**वासंती :** पाहूं तुमचा हात—

**कल्याण :** थांब—दाखवतों तुला हात !

[ गळ्यांतलें बँडेज काढून फेंकून देतो व हात गरगर फिरवतो.

**वासंती :** म्हणजे, हें काय ?

**कल्याण :** कांहीं झालं नाहीं मला !

**वासंती :** मग बँडेज कशाला बांधलं होतं ?

**कल्याण :** त्याशिवाय मी अिस्पितळांत गेलों होतों हें कोणाला खरं वाटणार ? बरं, तूं कां अशी दिसतेस ?

**वासंती :** सांगूं तुम्हांला ? रागावणार नाहींत ? मी काल रात्रीं जीव द्यायला समुद्रावर गेलें होतें !

**कल्याण :** मग काय झालं !

**वासंती :** मूर्खच आहांत कीं ! काय व्हायचंय ! वांचलेंन् काय ! म्हणून तर दिसतें आहे तुम्हांला !

**कल्याण :** जीव द्यायला जाण्यापूर्वी माझी आठवण केली होतीस का ?

**वासंती :** नाहीं, मारुतीच्या नांवाचा जप करीत होतें !

**कल्याण :** म्हणजे तुझे ते बजरंगबली काका–( थांबून ) कुठें आहेत ते !

**वासंती :** ते बाजारांत गेले आहेत. आज आम्हांला कोल्हापूरला जायचं आहे.

**कल्याण :** चल नीघ ! ( वेडावून ) म्हणे कोल्हापूरला जायचंय ! आतां कोल्हापूरच्या अंबाबाअीच्या दर्शनाला आपण जोडप्यानंच जाअूं ! काल मला टाकून अेकटी जीव द्यायला गेली होतीस नाहींका कार्टे ? घेअूं का आतां तुझा जीव !

[ तिला गुदगुल्या करूं लागतो. तशी ती ' मेलें–मेलें ' अशी मोठ्यानें हंसत ओरडते. अितक्यांत अंबादास येतात. त्यांच्या हातांत वरीचशीं पुडकीं आहेत व खांद्यावर रबरी रंगीत फुग्यांचें झाडच्या झाड आहे.

**अंबादास :** अरेच्या, मेलें–मेलें ! अं, हा कोण ? कल्याण, हरामखोर, होतोस कीं नाहीं बाजूला ! ती तुझ्याशीं लग्न करीत नाहीं म्हणून जीव घेतोस होय रे तिचा ? ( दोघे मोठ्यानें हंसतात. ) कारटे, तो जीव घेतो आहे तुझा, अन् तूं दांत विचकून हंसतेस ? वेड लागलंय का तुला—

**वासंती :** गंमत चालली आहे आमची नुसती—

**अंबादास :** गंमत चालली आहे तुमची ! अितक्या थराला गोष्टी आल्या आहेत तरी तुमच्या गंमती चालल्या आहेत काय अजून ? माझा अिथं प्राण चालला आहे अन् यांच्या गंमती चालल्या आहेत ! अन् काय रे निर्लज्जा, काल अेवढा प्रकार झाल्यानंतर फिरून अिथं येऊन तोंड दाखवायला तुला शरम कशी वाटली नाहीं ?

**वासंती :** काका, तें सगळं सगळं खोटं ठरलं—

**अंबादास :** खोटं ठरलं ! काय ?

[ यापुढें वासंती प्रत्येक वाक्याबरोबर अंबादासाच्या हातांतला अेक फुगा रबरी फोडते.

**वासंती** : हो, अगदीं खोटं ! निव्वळ पराचा कावळा !

**अंबादास** : पराचा कावळा !

**वासंती** : सगळ्या गोष्टींचा खुलासा झाला !

**अंबादास** : झाला ? अन् कुणीं केला !

**वासंती** : खरा चोर सांपडला !

**अंबादास** : पण कोण ?

**वासंती** : कल्याण पूर्ण निर्दोषी ठरला !

**अंबादास** : चल निघ, असल्या थापावर विश्वास ठेवणारा नाहीं मी ! पक्का कोल्हापूरचा आहे म्हटलं मीं ! आय ॲम कोल्हापूर्स. हा मनुष्य व्यसनी, हलकट, बदमाष, बदफैली आहे—

[ भाअीलाल, कौशिक व कांता येतात.

**भाअीलाल** : छेः छेः, काकासाहेब, अगदीं चुकतां आहांत ! शब्द परत घ्या ते ! कालचं आपलं सगळंच घसरलं ! कल्याणसारखा माणूस आढळायचा नाहीं तुम्हांला दुनियेंत—

**अंबादास** : काय–काय म्हणालांत ? फिरून बोला पाहूं ? ( भाअीलाल पुन्हां तेच शब्द उच्चारतो. ) पहा बरं, बदलाल फिरून आपलं मत !

**भाअीलाल** : छेः छेः, आतां हें मत ठरलं–अगदींच पक्कं !

**अंबादास** : टाळी द्या ! मग हेंच आम्ही सांगत होतों पहिल्यापासून ! मीं कल्याणला पाहिलं तेव्हांच ओळखलं ! म्हटलं माणूस असावा तर असा असावा ! अहो, माणसाचा चेहरा का कुठं लपतो आहे !

**कल्याण** : पण तुम्ही तर माझ्याशीं बोलायला देखील तयार नव्हता !

**अंबादास** : मी पहात होतों शांतपणें या मुंबअीच्या लोकांच्या अेकेक गंमती ! म्हटलं वेळ आली म्हणजे आपण बोलूं. अितक्यांतच कशाला ? तुम्हांला का खरं वाटलं होय माझं सोंग ?

**वासंती** : मग माझी निवड चुकली नाहीं ना ?

**अंबादास** : छट्, तूं किती केलंस तरी माझी पुतणी आहेस ! तुझी निवड कशी चुकणार ?

**भाअीलाल :** काकासाहेब, कल्याणला आम्हीं आमच्या कंपनीचा येत्या महिन्यापासून भागीदार करण्याचं ठरविलं आहे.

**अंबादास :** त्याच्या आधीं त्याला आमच्या ह्या कंपनीचा भागीदार करून टाकूं द्या मला. शुभस्य शीघ्रम्. हीं तरुण पोरं आहेत-यांना आतांच्या आतां अडकवून टाकलं पाहिजे लग्नाच्या बेडींत. नाहीं तर पुन्हां कांहीं तरी ब्रम्ह घोटाळा करायचीं हीं !

**भाअीलाल :** माझी भाची मीं या कौशिकला द्यायचं ठरविलं आहे.

**कौशिक :** मी फार आपला आभारी आहें.

**भाअीलाल :** तूं कसला, मीच तुझा फार आभारी आहे. माझ्या घरांतली ही घोरपड पत्करायला कोणीही आतांपर्यंत तयार होत नव्हता, तो तूं झालास; हें माझ्यावर काय कमी अुपकार झाले ? या घोरपडीमुळें तानाजीपेक्षां अितिहासांत तुझंच नांव अजरामर होअील. मंडळी, चला, आजचा हा आनंदाचा प्रसंग अेकत्र जेऊन आपण साजरा करूं. जेवायचं तयार आहे आंत—

**अंबादास :** ( जातां जातां ) मुंबअीला आल्यासारखं अेक कार्य तर जमलं ! ही सारी अुपासनिबाबांची कृपा !

जय हिंद